सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें | अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर १९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई, येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक' ९०६ शिवाजी-नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक 'नवभारत' मासिक C/o प्राज्ञप्रेस वाई ( ज. सातारा )









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# 'नवभारत' मासिक ऑक्टोबर १९५३

## —लेखक-परिचय—

**श्री. केदारनाथ** ( मुंबई )– ' सर्वोदय 'निष्ठ तत्त्वचिंतक आणि कार्यकर्ते, ' व्यवहारशुद्धि ' आंदोलनाचे प्रवर्तक. ' विवेक आणि साधना ' या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. रा. वि. ओतुरकर** –पुणें येथील लॉ एज्युकेशन सोसायटीच्या आर्ट्स् कॉलेजचे प्राचार्य. पुणें विद्यापीठांत इतिहासाचे प्राध्यापक. ' हिंदुस्थानचा साधनरूप इतिहास ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**डॉ. सरोजिनी बाबर** एम्. ए. पीएच्. डी. ( पुणें )– मुंबई विधानसभेच्या सदस्य. 'कमळाचं जाळं', ' अजिता ', ' हिरवा चुडा ' इत्यादि कादंबऱ्या, ' बालनाटिका ', ' भारतीय स्त्रीरत्नें ' ( बालवाङ्मय ) यांच्या लेखिका. ' समाज-शिक्षणमाले'च्या संपादिका व एक लेखिका.

**श्री. दुर्गा भागवत** एम्. ए. ( मुंबई )– समाजशास्त्र, डॉ. केतकर यांचें वाङ्मय यांवर यांचा विशेष व्यासंग असून, त्यांनीं ' राजारामशास्त्री भागवत यांचें चरित्र', 'Romance in Pali Folklore ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत.

**श्री. त्रिं. गो. देशमुख** एम्. ए. डी. जे. ( नागपूर )– ' जर्नालिझम ' या विषयाचा यांनीं डिप्लोमा घेतला असून, त्यांच्या संपादकत्वाखालीं येत्या २ ऑक्टो. १९५३ पासून ' मराठी जग ' हें नवीन साप्ताहिक सुरू होत आहे.

**श्री. ह. कृ. मोहनी**– ' तेजस्वी शिक्षण ', ' आमचा सनातन धर्म ' इत्यादि पुस्तकांचे लेखक. ' नव-भारता'चे एक संपादक.

**प्रा. दे. अ. दाभोलकर**– सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**डॉ. गो. रा. केळकर** एम्. एस्सी. पीएच्.डी.– पुणें येथील ' नॅशनल केमिकल लॅबोरेटरी ' मध्यें एक संशोधक. ' सृष्टिज्ञान ' या मासिकाचे एक संपादक.

**श्री. श्री. ग. बेडेकर** एम्. एस्सी. एम्. एस्. ( इलिनॉय ). पुणें येथील ' नॅशनल केमिकल लॅबोरेटरी ' मध्यें एक संशोधक.

**श्री. मनोहर देखणे** ( सोलापूर ). यांच्या लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**श्री. ज. श्री. देशपांडे** एम्. ए. एलएल्. बी. — बुलडाणा येथील प्रसिद्ध वकील. व्यवसाय. यांनीं बऱ्याच अध्यात्मपर कविता लिहिल्या असून त्या प्रकाशनाच्या मार्गावर आहेत.

**श्री. व. भ. कर्णिक** ( मुंबई )– 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट मूव्हमेंट'चे एक कार्यकर्ते. 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट' या साप्ताहिकाचे माजी कार्यकारी संपादक.

**श्री. मधु वाबगांवकर** — ( नागपूर ) यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रकाशित होत असतात.

**प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर** — पुणें येथील महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. मराठींतील ' व्यक्ति आणि वाङ्मय ', ' सुवर्णतुला ', ' राक्षस-विवाह ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

अनुक्रमणिका

श्री. के दा र ना थ

# दिव्य जीवन अर्थात् मानवी जीवन

सुरत येथें जून महिन्याच्या सुरवातीला भरलेल्या परिषदेंत 'दिव्य जीवना'वर पुष्कळ भाषणें झालीं. त्या प्रसंगीं वेळेच्या अभावीं मी माझे विचार सविस्तरपणें सांगूं शकलों नाहीं. ते कांहीं अंशीं स्पष्टपणें या लेखाच्या रूपानें जनतेसमोर ठेवण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

दिव्य जीवन म्हणजे मानवी सद्गुणांनीं समृद्ध शुद्ध जीवन. दिव्य शब्दाचा अर्थ यापेक्षां अधिक किंवा काल्पनिक मानण्याची आवश्यकता नाहीं. अशा रीतीचें जीवन प्राप्त करून देणारा जो धर्म तो मानवी धर्म. त्या मानवी धर्मानें आपण वागूं लागल्याशिवाय आपल्यास दिव्य जीवनाची आशा करतां येत नाहीं किंवा आशा करून कांहीं उपयोग नाहीं. त्या धर्मानें वागायचें असल्यास आपल्या विचारांत, आचारांत शुद्धता आणली पाहिजे. मानवी जीवन हें केवळ आपला व आपल्या स्त्रीपुत्रपरिवाराचा कसा तरी जीव वांचवून जगण्याकरितां किंवा वाटेल त्या विषयाच्या मागें लागून स्वच्छंदपणें किंवा स्वैरपणें वागून धन, मान, कीर्ति, प्रतिष्ठा अथवा अशाच प्रकारच्या मोहांत पडून आयुष्य संपवण्याकरितां नसून कांहीं उच्च, उदात्त व पवित्र ध्येय साध्य करण्याकरितां तें आहे अशी श्रद्धा प्रथम आपल्या मनांत त्याविषयीं असली पाहिजे. जीवनाचें महत्त्व आपण समजलों नाहीं, त्याची खरी किंमत आपल्या लक्षांत आली नाहीं तर आपल्या विचारांत शुद्धता येणार नाहीं. पशू, पक्षी व अन्य प्राणी यांपेक्षां मानव श्रेष्ठ आहे असें आपण म्हणतों, आपल्या जीवनाची किंमत त्यांच्यापेक्षां अधिक आहे असें आपण मानतों, पण ही गोष्ट तेव्हांच खरी म्हणतां येईल जेव्हां आपण आपल्या जीवनांत कांहीं उच्च ध्येय साध्य करूं, त्याकरितां आपण आपल्याला चांगले संस्कार लावून घेऊं. चांगल्या संस्कारांशिवाय आपल्यांत सद्गुण येणार नाहींत. सद्गुणांशिवाय मानवतेला आवश्यक असा आपला स्वभाव बनणार नाहीं. आणि तसा आपला स्वभाव बनला नाहीं तोंपर्यंत उच्च ध्येयप्राप्तीची आपल्याला आशा नाहीं.

### व्यवहारशुद्धीची जरूरी

तें ध्येय प्राप्त करण्याकरितां आपल्याला शुद्ध विवेकाची अत्यंत आवश्यकता आहे. त्याकरितां योग्य–अयोग्य, सार–असार, बरें–वाईट, उन्नति–अवनति यांविषयीं निर्णय करणारी शक्ति आपल्यांत सदैव जागृत ठेवावी लागेल. आपलें व इतरांचेंहि कल्याण कशांत आहे तें आपल्याला ठरवितां यावें लागेल. देश, काल, प्रसंग, परिस्थिति यांचें ज्ञान आपल्याला असावें लागेल. तें ज्ञान त्याचप्रमाणें शुद्ध विवेकबुद्धि व निर्णयशक्ति यांच्या साहाय्यानें प्रत्येक कठिण प्रसंगीं आपलें कर्तव्य काय आहे, आपला धर्म काय आहे तें आपण ओळखूं शकूं व आपल्यांत दृढता, निग्रह व संयमशक्ति असल्यास आपण अयोग्य कर्म व अधर्म यांना टाळूं शकूं. म्हणून विवेकाबरोबरच संयमशक्तीची व दृढतेची आपल्याला जरूर आहे. आपल्यांतील बऱ्या-वाईट संस्कारांप्रमाणें आपल्या मनाचे प्रवाह चालत असतात. त्यांतील वाईट प्रवाहांना– वाईट मनोवृत्तींना व कर्मांना आंवरून धरण्याचें काम संयमाचें आहे. मनुष्याच्या शारीरिक व बौद्धिक शक्तींचा जसजसा विकास होत जाईल तसतशी त्याची संयमशक्तीहि वाढत गेली पाहिजे. तशी ती वाढत गेली तरच मनुष्य त्या शक्तीचा चांगला उपयोग करून आपलें उच्च ध्येय गांठून आपलें कल्याण साधूं शकेल. गाडीचा वेग वाढवण्याची कला साध्य झाली पण तिला योग्य वेळीं थांबवण्याची कला किंवा योजना जर हातीं आली नाहीं तर तशा गाडीपासून ज्याप्रमाणें अनर्थ होण्याची खात्री असते त्याचप्रमाणें मनुष्यांत वाढत असलेल्या निरनिराळ्या शक्ती जर त्याला ताब्यांत ठेवण्याचें साधलें नाहीं तर त्या शक्तीच त्याच्या व मानवी समाजाच्या नाशाला कारण होणार असें निश्चितपणें समजावें. संयमानें आपल्यांतील विकारांना, दुष्टवृत्तींना आंवरण्याचें आपल्याला साधलें कीं आपलें मन निर्मळ होत जाईल. ती निर्मळता संयमशक्तीची वृद्धि करील. अशा रीतीनें उभयवृत्तींचा विकास परस्परांच्या आश्रयानें होत राहील. त्यांच्या विकासाशिवाय आपले व्यवहार शुद्ध होणार नाहींत व व्यवहार शुद्ध झाल्याशिवाय जीवन शुद्ध होणार नाहीं. म्हणून जीवनशुद्धीला व्यवहारशुद्धीची आवश्यकता आहे. दिव्य जीवन प्राप्त कर-








ण्याचा–उच्च ध्येय साध्य करण्याचा हा मार्ग आहे.

## सद्गुणसमृद्ध पुरुषार्थी जीवन

अधर्मातून स्वतःला वांचविण्याकरितां आपल्याला संयमाची व चित्ताच्या शुद्धीची जशी जरुरी आहे तशीच धर्ममार्गानें उन्नत होत राहण्याकरितां पुरुषार्थाची व सद्गुणांची आवश्यकता आहे. पुरुषार्थाशिवाय सद्गुण अंगीं येत नसतात. याचें कारण आपल्यांत सद्वृत्ति व सद्भाव उठत असले तरी त्यांना प्रत्यक्ष योग्य कर्मांत परिणत करण्याकरितां आपल्यांत भरपूर प्रेरक बळ असावें लागतें. निश्चयपूर्वक प्रयत्नशील राहिल्याशिवाय सत्कार्यें पार पडत नाहींत. सत्कर्माशिवाय सद्गुणांचा विकास होऊं शकत नाहीं. त्यांची परीक्षा व कसोटी त्यायोगेंच होत असते. सद्गुण व सत्कर्म याशिवाय केवळ चित्ताच्या शुद्धीनें जीवनाला पूर्णता येत नाहीं. विवेक, संयम व त्याबरोबरच सद्गुणवर्धक पुरुषार्थ या सर्वांच्या योगें मानवी जीवन कृतार्थ होऊं शकतें. सद्गुणांच्या द्वारां मनुष्यांतील पुरुषार्थ प्रकट होत असतो. त्यायोगें संयम व मनःशुद्धीला तेजस्विता येऊन तीं प्रभावी होत असतात. शुद्धीवांचून केवळ पुरुषार्थानें मानवी जीवन आसुरी बनण्याचा पूर्ण संभव आहे. त्यायोगें आपली व इतरांची अधोगति होण्याची खात्री आहे. दिव्यजीवनप्राप्तीचा तो मार्ग नाहीं. दया, परोपकारवृत्ति, उदारता, मातृ-पितृभाव, बंधुभगिनीभाव, सत्य, प्रामाणिकता, मैत्री इत्यादि जे मानवजातीचा अभ्युदय व उन्नति होण्याकरितां आवश्यक असे सद्गुण तेच मानवाची खरी संपत्ति होत. चित्ताच्या शुचितेशिवाय हे सद्गुण पूर्ण विकसित होऊं शकत नाहींत. आपल्यांतील मलिनता आपल्या सद्वृत्तींना व सद्गुणांना प्रतिबंधक होत असते. त्यायोगें मानव्याची गति कुंठित होते. म्हणून शुद्धीचा आग्रह ठेवून सद्गुणांनीं समृद्ध असें पुरुषार्थी जीवन सिद्ध करण्याचा आपला प्रयत्न असला पाहिजे. यांतच पूर्णता आहे. यांतच मानवतेची सिद्धि आहे. जीवनाला बाहेरून शोभा आणावी किंवा कांहीं तरी अवडंबरानें आपल्याला महत्त्व आणावें असा आपल्या जीवनाचा हेतु आपण न ठेवतां जीवनांतील हरएक क्षेत्रांत, शरीर, बुद्धि व मन यांकडून होणाऱ्या प्रत्येक क्रियेंत, वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक, धार्मिक, राष्ट्रीय, जागतिक वगैरे संबंधांतील आपल्या सर्व विचारांत, भावनांत, कर्मांत परिशुद्धता याची असा आपला पवित्र व उदात्त हेतु असला पाहिजे. विवेक, संयम, सद्गुण व पुरुषार्थ यांची आपल्यांत वृद्धि होत राहून आपलें जीवन संपूर्णपणें निर्मल, निर्दोष व व्यवस्थित व्हावें व आपण सर्वांनीं परमात्म्यानें मानवजातीकरितां नियोजित केलेल्या शुभ व मंगल ध्येयाकडे सतत वाटचाल करीत राहावें हा परमोच्च हेतु आपल्या जीवनांतील प्रत्येक कर्मांच्या मागें असला पाहिजे. सद्गुणांची व त्या द्वारां मानवतेची पूर्णता व्हावी अशी आपल्याला तळमळ असली पाहिजे. या हेतूच्या आपल्या प्रयत्नांना आत्मशुद्धीपासूनच प्रारंभ होऊन मानवतेच्या सिद्धींत त्याची परिसमाप्ति व्हावी. या सिद्धींतच जीवनाची कृतार्थता व सार्थकता आहे. अशा प्रकारचें जीवन तेंच खरें मानवी जीवन आहे. त्यालाच कोणी दिव्यजीवन म्हटलें तरी हरकत नाहीं.

## आजची आपली स्थिति

दिव्य जीवन किंवा आध्यात्मिक जीवन यांविषयीं आपण जेव्हां बोलतों किंवा लिहितों तेव्हां आपल्यांतील एकंदर संस्कारानुसार आपले तात्त्विक, आध्यात्मिक, धार्मिक ग्रंथ, आपली प्राचीन संस्कृति, ईश्वरी अवतार, ऋषि, मुनि, आपले पूर्वज वगैरेंचें खूप गौरवानें व अभिमानानें आपण वर्णन करतों. या सर्व गोष्टी अभिमान बाळगण्यासारख्या व प्रशंसा करण्यासारख्या आहेत यांत संशय नाहीं. पण तो गौरव व अभिमान यांबरोबरच आपण आपल्या आजच्या स्थितीचाहि विचार केला पाहिजे असें वाटतें. त्याबरोबरच आपल्या मनांत हेहि प्रश्न उत्पन्न झाले पाहिजेत कीं भारतभूमींतच पुनः पुनः ईश्वराचे अवतार कां होत आले आहेत? पाप फार झालें म्हणजे ईश्वर अवतार घेत असतो असें मोठमोठ्या ग्रंथांत लिहिलेलें आहे. तर भारतभूमींतच पुनः पुनः पापाची इतकी वृद्धि कां होत असते? आणि पुनः पुनः ईश्वराचे अवतार या भूमींत होऊनहि आपली प्रजा आजहि अशा अवनत स्थितींत कां म्हणून असावी? ज्ञानानें भरलेले आपले बहुमोल ग्रंथ, आपली उच्च संस्कृति, महान् पुरुषांची अखंड परंपरा हें सर्व भाग्य आपल्या वांट्याला आलें असतां आज आपली इतकी घोर अवनति कां व्हावी? आज आम्ही आमच्या पुराण धर्माप्रमाणें वागत नाहीं असें मानलें तरी हजार वर्षांपूर्वीं किंवा त्यापूर्वींहि आम्ही आमच्या धर्माप्रमाणें वागत असतां त्यावेळींहि प्रत्येक परदेशी आक्रमणापुढें



अनुक्रमणिका






बहुतेक प्रसंगीं आम्हांला हारच कां खावी लागत आली आहे ? परदेशांतून आलेले केवळ पोटभरू किंवा लुटारूहि हिंदुस्थानांत सत्ताधीश व सम्राट् बनून गेल्याचें इतिहासावरुन दिसून येत आहे. आम्ही आपसांत भांडायला शूर पण परदेशी लोकांपुढें निर्बळ व हीनदीन टरत आलों आहों यांची कारणें काय ? जगांतील इतर लोकांपेक्षां आम्ही अधिक धार्मिक व सुसंस्कृत आहों, तत्त्वज्ञानाचा विकास आमच्या देशांत सर्वांत अधिक झाला आहे असें आम्ही समजतों. या सर्व गोष्टी जर खऱ्या मानल्या तर इतर देशांतील लोकांपेक्षां आम्ही व्यवहारांत अधिक अप्रामाणिक व स्वार्थी कां म्हणून ? आपल्याच देशबांधवांना लुटून, त्यांची पिळवणूक करुन, त्यांचें शोषण करुन स्वतः सुखी होण्याची समाजघातकी वृत्ति आमच्यांत बहुतेक सर्वत्र दिसून येते, ती कां ? पुनर्जन्म, परलोक यांवर श्रद्धा ठेवणारे, मोक्ष ओश्वर वगैरेविषयीं आस्तिक्यबुद्धि बाळगणारे आपण प्रत्यक्ष चालू जीवनांत सत्याला सोडून कां वागतों ? धर्माविषयीं अभिमान बाळगणाऱ्या आपल्यांत राष्ट्रप्रेम व बंधुप्रेमाचा इतका अभाव कां दिसून यावा ? राष्ट्रविषयक कर्तव्याच्या बाबतींत आपल्या औदासीन्याची मजल राष्ट्रद्रोहापर्यंत कां जावी ? संसाराविषयींच्या वैराग्याचें पर्यवसान कर्तव्यभ्रष्टता, बंधुद्रोह, पंगुता, भीरुता वगैरे दोषांत व दुर्गुणांत कां व्हावें ? आमचें राष्ट्रीय, सामाजिक, आर्थिक व कौटुंबिक जीवन सर्व बाजूंनी असें छिन्नभिन्न होण्याचीं काय कारणें असावीं ? शरीर व बुद्धीच्या सामर्थ्याच्या मानसिक पावित्र्याच्या बाबतींत आपली अशी हीन अवस्था कां असावी ? आज या भारतवर्षांत लाखों नव्हे तर कोट्यवधि लोक असे आहेत कीं ज्यांना खायला पुरेसें अन्न मिळत नाहीं, पांघरायला धड वस्त्र नाहीं, रहायला घर किंवा झोंपडें नाहीं. कोट्यवधि बालकें आज दुधावांचून जीवन काढीत आहेत. कशींतरी जगत व वाढत आहेत. आणि सर्वांत दुःखाची गोष्ट म्हणजे कष्ट करायला तयार असणाऱ्या हजारों लोकांना काम मिळत नसल्यामुळें उपासमार काढावी लागत आहे. माणसाच्या आकारांत कसाबसा त्यांच्यांत जीव टिकून राहिला आहे ! ही स्थिति देशांत वाढत चालली आहे. ही खरोखरी उद्वेगजनक स्थिति आहे ! आणि याहि स्थितींतून बंधुद्रोही व देशद्रोही किंवा कोणतेंही पाप करायला मागेंपुढें न पाहणारे लखोपति हे करोडपति बनत आहेत. काळा बाजार करणारे, लांचलुचपत घेणारे व देणारे, मालांत भेसळ करणारे, योग्य टॅक्स देण्यांत चोरी करणारे हे धनाच्या लाभाबरोबरच मानप्रतिष्ठाहि मिळवीत आहेत ! या सर्व गोष्टींची कारणें व त्यांतील प्रश्नांची उत्तरें आपण शोधून काढलीं पाहिजेत.

## सहृदयता किंवा समभाव

आपल्या स्वतःच्या व आपल्या भोंवतालच्या या दुःख-उद्वेग-जनक स्थितींतून आपल्याला दिव्य जीवन प्राप्त करायचें आहे या गोष्टीचें आपल्याला सदैव स्मरण असलें पाहिजे. दिव्यजीवनाच्या व्यक्तिगत आशेंत ही वास्तविक व सार्वत्रिक स्थिति विसरुन आपलें चालणार नाहीं. या वर वर्णन केलेल्या स्थितींत ज्यांना अतिशयोक्तीचा संशय येत असेल त्यांनी स्वतः देशस्थिति शोधून पाहावी आणि जर ती याप्रमाणें आहे असें त्यांच्या प्रत्ययास आलें तर या स्थितींतून आपण दिव्यजीवन कसें प्राप्त करूं शकणार याविषयीं त्यांनी गंभीरपणें विचार करावा. ही स्थिति अशीच कायम ठेवून आपण दिव्यजीवन प्राप्त करूं शकूं अशी कोणाची समजूत असेल तर ती भ्रांति आहे असें मोठ्या नाइलाजास्तव म्हणणें भाग आहे. आपल्या स्वतःविषयींची ज्यांची कल्पना आपल्या देहापुरतीच असेल, आपण म्हणजे आपलें शरीर व त्यांत वसत असलेला आत्मा इतकीच ज्यांची आत्मविषयक भावना असेल त्यांची गोष्ट सोडून दिली, तर त्यांशिवाय इतर प्रत्येकाला—ज्याच्या ज्याच्या हृदयांत दुसऱ्यांविषयीं कांहीं सहृदयता वास करीत आहेत त्या त्या प्रत्येकाला—आजच्या आपल्या अवनत व कंगाल स्थितीबद्दल दुःख वाटल्याशिवाय राहणार नाहीं. ज्याचें आत्मत्व विशाल झालें आहे, सर्वांशीं समरस होण्याइतकी सहृदयता ज्याच्या ठिकाणी आहे, तो आपल्या एकट्याच्या सुखदुःखानें स्वतःला सुखी किंवा दुःखी कधीं मानीत नाहीं. 'आत्मवत् सर्वभूतेषु' हा सिद्धान्त जर मानव्याच्या खऱ्या श्रेष्ठतेचा दर्शक असेल तर ज्याला ज्याला म्हणून त्या श्रेष्ठतेला पोहोंचण्याची आकांक्षा असेल त्यानें त्यानें सर्वांविषयीं सहृदयता धारण केल्याशिवाय चालणार नाहीं. आणि सहृदयता हा ज्याच्या हृदयाचा स्वाभाविक धर्म बनला असेल त्याला हा महासिद्धान्त केवळ मान्य केल्यानें शांति, समाधान न वाटतां तो आचरणांत आणल्या-












शिवाय शांति वाटणार नाहीं. सहृदयता म्हणजे समभाव हा दैवी किंवा सर्वोच्च मानवी भाव आहे. तेंच मानवतेचें श्रेष्ठ लक्षण आहे. तें अंगीं बाणल्याशिवाय दिव्यजीवन प्राप्त होणें शक्य वाटत नाहीं. केवळ एकादा उच्च सिद्धान्त मान्य केल्यानें आत्म्याची विशालता प्रतीतीस येत नाहीं. ज्यांचें आत्मत्व आपल्या शरीरांतच रमत असेल त्यांना हा विचार पटणार नाहीं, व कदाचित् पटला तरी आचरतां येणार नाहीं. पण दिव्यजीवनाची आकांक्षा बाळगणारांनीं आपली आजची स्थिति ओळखली पाहिजे. आपल्या पतनाचीं व अवनतीचीं कारणें शोधून काढलीं पाहिजेत. आपल्या विशालतेची यथार्थ कल्पना त्यांच्या लक्ष्यांत आली पाहिजे व या सर्व गोष्टी जाणून आपल्या सार्वत्रिक अवनतींतून आपल्या उद्धाराचा मार्ग त्यांनीं शोधून काढला पाहिजे.

## केवळ जीवदशेंतून विशाल आत्मत्वाकडे

परमात्म्यानें मनुष्याला सर्व प्राण्यांपेक्षां अधिक बुद्धि दिली आहे. ती वाढविण्याकरितां जिज्ञासावृत्तीहि दिली आहे. तिच्या योगें त्याचें ज्ञान वृद्धिंगत होत आलें व होत आहे. त्या ज्ञानाच्या साहाय्यानें मनुष्य आपल्या व अितरांच्या सुखदुःखांचीं कारणें शोधून काढतो. मनुष्यांतील मुख्य सद्गुण जे दया, सहानुभूति व सहृदयता हे ज्याच्यांत असतात तो प्राप्त ज्ञानाचा उपयोग आपलें व इतरांचें दुःख दूर करून सुखाची वृद्धि करण्यांत करतो. ज्ञान, सद्भाव व कर्तृत्व यांच्या वाढत्या प्रमाणावरून मनुष्यांतील मानवतेची परीक्षा होत असते. इतरांचें दुःख आपल्याला किती असह्य होतें व तें दूर करण्याकरितां आपण काय करतों, किती सोसतों, त्याचप्रमाणें इतरांच्या सुखानें आपल्याला किती संतोष वाटतो, त्यावरून आपल्यांतील मानवतेचें प्रमाण ठरत असतें. आपल्या शरीराला किंवा त्याला व्यापून असणाऱ्या तत्त्वालाच आत्मा समजण्याइतकें संकुचित आत्मत्व किंवा आपलेंपण आपण मानूं तर आपण जीवदशेंतून फारसे वर आलों नाहीं असें सिद्ध होईल. आपलेपणाच्या संकुचित मर्यादा टाकीत व ओलांडीत मानवजात आज कितीतरी पुढें गेली आहे. आपली व्यापकता तिनें वाढवली आहे. ती व्यापकता कोणी " आपण सर्व एकाच ईश्वराचीं लेंकरें आहों " या उदात्त शब्दांनीं, तर कोणी " आपण सर्व भाऊ भाऊ आहों " या वचनानें, तर कोणी " घटाघटांत एकच तत्त्व आहे " या वाक्यानें व्यक्त केली आहे आणि ज्यांना यापेक्षां दिव्यदृष्टि प्राप्त झाली, त्यांना " सर्वं खल्विदं ब्रह्म " आणि " अहं ब्रह्मास्मि " म्हणण्यापर्यंत आपल्या व्यापकतेचें दर्शन झालें आहे. या सर्व महावाक्यांवर आपली श्रद्धा असेल तर त्यांतील अर्थानुसार आपण आपलें आत्मत्व मानून तें विकसित केलें पाहिजे. तेव्हांच जीवदशेंतून आपला उद्धार होऊन आपण स्वतःला मनुष्य म्हणवून घेण्याला पात्र होऊं. ती पात्रता येण्याकरितां समभाव वाढविणाऱ्या प्रत्येक सद्गुणाची आपल्याला आवश्यकता आहे. आपल्या शरीराइतकाच आत्म्यालाहि आपण संकुचित मानूं व त्यालाच सुख, ऐश्वर्य, मान, प्रतिष्ठा किंवा मोक्ष मिळाला कीं आपण कृतार्थ होऊं असें मानून राहूं तर महापुरुषांच्या श्रेष्ठ वचनांवर आपली श्रद्धा नाहीं असा त्याचा अर्थ होईल. आणि अशा अश्रद्धावस्थेंत दिव्य जीवनाची आशा करायला आपल्याला जागा राहणार नाहीं. म्हणून सर्वांविषयीं आत्मवत् भाव आपल्याला वाटला पाहिजे. विशाल आत्मत्वाशिवाय – सर्वांविषयीं सद्भावाशिवाय मानवतेची पूर्णता साधणार नाहीं.

## आपला उद्धार आपल्याच हातीं

ती पूर्णता साधावी हा आपल्या जीवनाचा हेतु असेल तर मानवतेच्या विकासाच्या मार्गानें आपण मार्गक्रमण करीत राहिलें पाहिजे. म्हणजे मानवधर्मानें वागत राहिलें पाहिजे. आपली उन्नति, उद्धार, गति, मुक्ति, सार्थकता किंवा दिव्य जीवन, शुद्ध जीवन कांहीं म्हणा– हें सर्व मानवधर्मानेंच प्राप्त होणें शक्य आहे. त्याकरितां आपण शुद्धि, सद्गुण व पुरुषार्थ यांची वाढ केली पाहिजे. या धर्मानें आपण वागत राहूं तर आपल्या उद्धाराकरितां परमेश्वराच्या अवताराची वाट पहात राहण्याची मग आपल्याला आवश्यकता वाटणार नाहीं. आपला सर्वांचा उद्धार आपणां सर्वांच्या हातीं आहे अशी श्रद्धा आपल्या ठिकाणीं निर्माण होईल. पण या धर्मानें न वागतां स्वैरपणें, स्वच्छंदपणें, स्वार्थीपणें आपण वागत राहूं तर परमात्माहि आपलें कल्याण करूं शकणार नाहीं. श्रीकृष्णासारखे अनेक प्रकारें सामर्थ्यवान्– ज्यांना आपण परमात्म्याचा अवतार मानतों– ते साक्षात् आपल्यांत वावरत होते त्यावेळींहि धर्मराजांना द्यूताच्या अनर्थांतून ते वांचवूं शकले नाहींत. बंधुद्रोह











व आपसांतील कलह यामुळें अठरा अक्षौहिणींचा निःपात त्यांच्या देखत झाला. त्यांच्या समक्षच छप्पन कोटी यादवांनीं दारूच्या धुंदींत आपसांत लढून एकमेकांचा संहार केला. त्या सर्वांचे पारिणाम एकंदर समाजाला किती विपरीत व अनिष्टपणें भोगावे लागले तें आपण जाणत आहों. सारांश, आपण दुर्गुणी व व्यसनासक्त असलों, इतरांचा घात करून स्वार्थ साधणारे असलों तर परमेश्वराचा अवतार ज्याला म्हणतां येईल असा पुरुष जरी मानवरूपानें आपल्यांत असला, आपली वाटेल ती सेवा करण्यास तो तत्पर असला, तरी तो आपल्याला अनर्थांपासून वचावून आपला उद्धार करूं शकत नाहीं ही गोष्ट इतिहासपुराणांवरून सिद्ध आहे. मग आज आपण अधर्मानें वागत असतां केवळ त्याचें नामस्मरण करीत राहून आपला उद्धार कसा होऊं शकेल ? त्यापेक्षां आपण धर्मानें वागत राहिलों तर केवळ ईश्वरावरील निष्ठाहि आपल्याला महान् संकटांतून तारूं शकेल, आपला उद्धार करूं शकेल. धर्म व निष्ठा यांत सर्व प्रकारचें सामर्थ्य भरलेलें आहे. अधिक सूक्ष्म विचार करून पाहतां धर्म व ईश्वरनिष्ठा या एकमेकांशीं अगदी असंबद्ध अशा दोन गोष्टी आहेत, असें नव्हे. कारण धर्म आहे तेथें निष्ठा असणार व निष्ठा तेथें धर्माचरण घडत राहणारच असा नियम आहे. खरी निष्ठा केवळ ईश्वराचें नांव घेण्यांत, त्याचें वर्णन करण्यांत, त्याची स्तुतिस्तोत्रें गाण्यांत किंवा त्याच्या नांवानें कांहीं कर्मकांड करीत राहण्यांत नसून महापुरुषांनीं सांगितलेला धर्म आचरण्यांत आहे. तो धर्म म्हणजे मानवधर्म.

## विश्वव्यापाराशीं समरस होणें किंवा समर्पण

तो धर्म आपल्याला समजला पाहिजे. त्याचें चिंतन, मनन करून तो आचरणांत आणण्याकरितां लागणारे सद्गुण आपण प्राप्त केले पाहिजेत. मानवी जीवन एकाकी नाहीं. आपण सर्व मिळून तें बनलेलें आहे व सर्वांच्या सहकारानें, परस्परांच्या साहाय्यानें तें चाललें आहे हें आपल्याला समजलें पाहिजे. आपणा सर्वांना तें सुखरूप व कल्याणप्रद होईल अशा रीतीनें तें चालविण्यास आपण शिकलें पाहिजे. परस्परांत विश्वास व ऐक्य राहण्याकरितां लागणारे गुण आपण संपादन केले पाहिजेत. एकाच विश्वशक्तींतून–परमशक्तींतून निर्माण होऊन आपण सर्व आजच्या अवस्थेला येऊन कसे पोहोंचलों तें जाणण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. व आपण सर्व पुनः त्याच परमशक्तींत कोणी कोणाला भिन्नपणें ओळखूं शकणार नाहीं अशा अवस्थेंत शेवटीं विलीन होऊन जाण्याचा कसा संभव आहे तेंहि आपण जाणलें पाहिजे. उत्पत्ति-स्थिति-लयाच्या विश्वाच्या घटमाळेंत– या अखंड व्यापारांत देहाच्या निमित्तानें प्रकट दर्शला आलेलें 'अहं' परमशक्तीच्या मानानें किती क्षुद्र आहे तें आपण ओळखूं शकलों तरच आपण निष्कामपणें व निरहंकारपणें धर्माचरण करीत राहूं हेंहि आपल्याला समजलें पाहिजे. परमात्म्याच्या चिंतनानें, मननानें त्याच्या विश्वव्यापाराशीं आपण जसजसे समरस होत जाऊं तसतसें आपल्याला कळून येईल कीं या विश्वांत, या जीवनांत आपलें स्वतःचें निराळें असें कांहीं नाहीं. देह, बुद्धि, मन, प्राण, इंद्रियें त्याचप्रमाणें त्यांतील धर्म, शक्ति, गुण, भाव, कर्तृत्व इतकेंच नव्हे तर चेतन आत्मा हीं सर्व त्याचीच प्रकट दर्शनें आहेत. हीं सर्व त्यांतूनच निर्माण होऊन सद्यःस्थितीला आलीं आहेत. हीं सर्व दर्शनें व त्यांतूनच उठणारी विद्या, ज्ञान, धन, बल, सत्ता, सामर्थ्य, सद्गुण यांसारखीं विविध दर्शनें वगैरेंपैकीं कोणत्याहि वैशिष्ट्यावर आपला अधिकार नाहीं. म्हणून त्यापैकीं कशाविषयींहि आपण व्यक्तिगत अहंकार न बाळगतां, त्यांचा केवळ स्वसुखार्थ लोभ न धरतां त्यापासून जीवनोपयोगी जें जें कांहीं प्राप्त होत असेल तें सर्व सर्वांच्या हितार्थ सदैव अर्पण करीत राहणें हाच खरा मानवधर्म आहे, हेंच खरें ईश्वरसमर्पण आहे. भक्तीची परिसीमा, ज्ञानाचें अंतिम साध्य, योगाची सिद्धि वगैरे सर्व कांहीं या समर्पणांतच आहे. जीवनभर निष्काम व निरहंकारपणें कर्तव्य करीत राहण्यास या धर्माची जरूरी आहे.

मानवतेची पूर्णता या समर्पणांत व सहृदयतेनें सर्वांशीं समभाव राखून आत्मत्वाची विशालता साधण्यांत आहे. ही पूर्णता तेंच दिव्य जीवन. दिव्य जीवन तीच जीवनशुद्धि किंवा जीवनसिद्धि. ती प्राप्त करण्याकरितां आपल्या सर्वांचा जन्म आहे. ती सिद्धि प्राप्त करून देणारा तोच मानवधर्म. त्या धर्मांत सर्वांच्या कल्याणाचें सामर्थ्य भरलेलें आहे. परमात्म्याच्या कृपेनें त्या मानवधर्मानें वागण्याची सन्मति सर्वांना होवो हीच प्रार्थना !

---



अनुक्रमणिका






भारतीय इतिहासाच्या योजना व अध्ययन यांचें समालोचन : प्रा. रा. वि. ओतुरकर

# इतिहासाच्या अभ्यासांतील नव्या गरजा

इ. स. १८२६ सालीं ग्रँट डफनें मराठ्यांचा इतिहास लिहिला तेव्हांपासून गेल्या शेसव्वाशें वर्षांत महाराष्ट्रांत इतिहासाचा अभ्यास कोणकोणत्या स्थित्यंतरांतून गेला या गतकालच्या प्रगतीचें सिंहावलोकन करावें असा या लेखाचा उद्देश नाहीं. कारण असें सिंहावलोकनाचे थोडेबहुत प्रयत्न पूर्वी झाले आहेत. म. म. द. वा. पोतदार यांनीं 'अर्वाचीन मराठी साहित्य' या ग्रंथांत अशा प्रकारचा इतिहासाभ्यासाचा धांवता आढावा इ. स. १९३५ पर्यंत आणून ठेवला आहे तो जिज्ञासूंनीं पहावा. हें झालेलें आजपर्यंतचें बरेंवाईट कार्य लक्षांत घेऊन या विषयाच्या अध्ययनांत कोणत्या उणीवा राहून गेल्या आहेत व त्या पुऱ्या करण्याच्या जबाबदारीची जाणीव समाजांत उत्पन्न झाली आहे किंवा नाहीं या संबंधीं जे अनेक स्फुट विचार मनांत येतात ते प्रस्तुत लेखांत वाचकांपुढें मांडण्याचा यत्न करीत आहें. एक-एका विषयाच्या अभ्यासकानें आपापल्या विषयांतलि ज्ञानाची समाजिक दृष्ट्या प्रगति कितपत झाली आहे, अभ्यासाची वाढ सर्वांगीण होत आहे कीं त्यांत कांहीं एकांगीपणा उत्पन्न झाला आहे असा प्रश्न स्वतःला विचारला पाहिजे व त्याचें यथामति उत्तर देण्याचा यत्न करणें जरुर आहे असें मला वाटतें.

स्वतंत्र भारताच्या नागरिकास कशाप्रकारचें ऐतिहासिक वाङ्मय वाचावयास उपलब्ध होणें अवश्य आहे, याचा विचार केल्यास महाराष्ट्रांतील इतिहास-विषयक वाङ्मय तुटपुंजें व वरवरचें आहे असें वाटूं लागतें. मर्यादित म्हणण्याचें कारण जें कांहीं ऐतिहासिक वाङ्मय उपलब्ध आहे तें मुख्यतः मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं आहे व त्यांतहि पुरेशी सखोलता नाहीं. रानडे व राजवाडे यांच्यानंतर ऐतिहासिक घटनांची सखोल व चिकित्सक मिमांसा करणारा इतिहासकार महाराष्ट्रांत निपजला नाहीं. केवळ मराठ्यांच्या इतिहासापलीकडे भारतीय इतिहासाचा विचार केल्यास त्यासंबंधीं मराठींतील वाङ्मय अगदींच तुटपुंजें असून भारतीय वीरांच्या कथा या स्वरूपाच्या पलीकडे तें फारसें गेलेलें नाहीं. या विषयावर असलेल्या शालोपयोगी व इतर पुस्तकांवर इंग्रजी पुस्तकांच्या, निदान इंग्रजी भाषेंत व्यक्त झालेल्या कल्पनांच्या भाषांतराची व उसनवारीची छाप पडलेली आहे. अलीकडे प्राचीन भारताचा अधिक सखोल अभ्यास व्हावयास लागल्यापासून प्राक्कालीन भारताच्या वैभवाचीं वर्णनें इंग्रजी पुस्तकांतील उसनवारीच्या उथळपणानें केलेलीं अशीं मराठींत पाहावयास सापडतात. पण सबंध भारताचा इतिहास सुसंगत रीतीनें आकलन करुन तो सुटसुटीत रीतीनें लिहिलेला असें पुस्तक मराठी वाङ्मयांत नाहीं. प्राचीन काळीं भारत उन्नतीच्या शिखरावर होता किंवा पाश्चिमात्यांच्या मानानें प्रगत होता तर तो या शर्यतींत मागें कां पडला याची सोपपत्तिक मिमांसा करणारें पुस्तक मराठी वाङ्मयांत नाहीं. अलीकडे भारतीय विद्यापीठांतून हिंदुस्थानच्या इतिहासास प्राधान्य मिळाल्यापासून हिंदी लेखकांनीं लिहिलेलीं भारताच्या इतिहासाचीं इंग्रजी पुस्तकें पाहावयास सांपडतात व त्यांतील कांहीं बऱ्यांपैकीं आहेत. परंतु या सर्व पुस्तकांत आपल्या देशाच्या इतिहासाकडे एका स्वतंत्र दृष्टिकोनांतून साकल्यानें पाहाणारें असें श्री. पणिकर यांचें 'ए सर्व्हे ऑफ इंडियन हिस्टरी' हें पुस्तक फार महत्त्वाचें आहे. त्या धर्तीवर अधिक सविस्तर अशीं पुस्तकें मराठींत व इतर भारतीय भाषांतून प्रसिद्ध व्हावयास हवींत.












## प्रदेशांच्या इतिहासाची आवश्यकता

परंतु एवढ्यानेंहि भागणार नाहीं. कै. साने गुरुजींचें आंतरभारतीचें स्वप्न साकार करावयाचें असल्यास नुसती भारतांतील भाषाभगिनींचीच ओळख करुन घेणें पुरें होणार नाहीं. त्या त्या प्रदेशांच्या इतिहासाचें स्वतंत्रपणें ज्ञान करुन घेणें अवश्य आहे. मराठी भाषेंत गुजरात, कर्नाटक, तामीळ, तेलगू, बंगाली, पंजाबी, आसामी, उडिया, हिंदी या भागांतील लोकांचा स्वतंत्रपणें आटोपशीर रीतीनें इतिहास सांगणारीं पुस्तकें मराठी वाचकांस वाचावयास हवीं आहेत. यासाठीं नुसतीं एतद्‌विषयक इंग्रजी पुस्तकांचीं भाषांतरें करुन काम भागणार नाहीं. इंग्रजींत प्रसिद्ध झालेल्या मराठ्यांच्या इतिहासाचें बंगालींत वा गुजराथींत भाषांतर केल्यानें महाराष्ट्राच्या इतिहासाचा गुजराथी व बंगाली लोकांना नीटसा परिचय होणार नाहीं. एखाद्या प्रदेशाचा इतिहास नीट कळण्यास त्या प्रदेशाची अस्मिता काय आहे याचें नीट आकलन झालें पाहिजे व तें प्रत्येक प्रांतीयानें आपापल्यापरीं स्वतंत्र रीतीनें करुन घेतलें पाहिजे. बंगाल किंवा कर्नाटक या प्रांतांचा इतिहास व तेथील लोकांची परंपरा नीट समजावून घ्यावयाची तर आपल्याकडील अभ्यासकांनीं त्या प्रदेशाची भाषा शिकून, तेथील वाङ्मयाची ओळख करुन तेथील लोकांचे विचार समजावून घेऊन मग त्या प्रदेशाचा इतिहास लिहिल्यास, तशा प्रकारचा मराठींत लिहिलेला बंगालचा इतिहास कांहीं वेगळयाच प्रकारचा होईल. अर्थात् अशा इतिहासांतहि कांहीं दोष राहतील. उदा०, बंगालचा इतिहास लिहिणारा महाराष्ट्रीय महाराष्ट्राबद्दल अवास्तव अहंकार बाळगणारा असल्यास त्यानें लिहिलेलें पुस्तक चांगलेसें उतरणार नाहीं. पण अशा प्रकारचे व्यक्तिविषयक दोष कालांतरानें कमी होत जातील. वर सांगितल्याप्रमाणें महाराष्ट्रीय अभ्यासकांनीं भारतांतील त्या त्या प्रदेशांत कांहीं दिवस वास्तव्य करुन, तेथील भाषा शिकून त्या आधारावर लिहिलेलीं इतिहासाचीं पुस्तकें हवीं आहेत. एरव्हीं चैतन्य, नरसी मेहता, कनकदास, पुरंदरदास यांची गुणवत्ता नीटशी ध्यानांत येणार नाहीं. शेजारच्या कर्नाटक किंवा तेलगु प्रांतासंबंधीं आमच्या मनांत अज्ञान किंवा दुर्ग्रह आहे. त्याचा निरास होण्यास त्या त्या प्रांताचें इतिहासकालीन वैभव चांगल्या प्रकारें समजलें पाहिजे. भारतीय संस्कृतीचें "अविभक्तं विभक्तेषु" अशा प्रकारचें जें वर्णन करण्यांत येतें त्याची जाणीव या योगानें होईल. स्वतंत्र भारताची राज्यघटना ही संयुक्त स्वरुपाची आहे. भारतीय भावी इतिहासाचें स्वरुप तशाच प्रकारें युरोपच्या इतिहासाच्या धर्तीवर संयुक्त स्वरुपाचें असावें. त्यांत प्रत्येक प्रांताची अस्मिता प्रकट होऊन त्या सर्वांची मिळून संकलित अशी भारतीय अस्मिता आपल्या तेजानें उठून दिसावी. या दृष्टीनें भारताचा इतिहास पुढील चार-पांच वर्षांत लिहिला जाणें आवश्यक आहे.

## आशियाई राष्ट्रांचें वाढतें महत्त्व

भारताच्या विद्यमान गरजा लक्षांत घेतल्यास नुसतें भारतीय इतिहासाचें यथार्थ स्वरुप माहीत होणें पुरेसें नाहीं. विद्यमान काळीं आशिया हें जागृत झालेलें खंड असून भारतास भौगोलिक व राजनैतिक दृष्ट्या महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. या विचाराचा उच्चार पं. जवाहरलाल नेहरु विशेषतः युरोपियन समाजापुढें भाषण करीत असतांना वारंवार करीत असतात. याबद्दल आपल्या मुख्य प्रधानाचें नुसतें भोळें कौतुक करण्यांत अर्थ नाहीं. पुढाऱ्यांनीं व्यक्त केलेले विचार व मारलेली भरारी यांस पुरें पडण्याचें कर्तृत्व त्या त्या देशांतलि नागरिकांनीं न दाखविल्यास पुढारी व जनता यांतील अंतर वाढत जातें व पुढाऱ्यानें मारलेली भरारी पोकळ ठरण्याची फार भीति असते. भारताच्या अगदीं शेजारीं असलेल्या अफगाणिस्तानची किंवा पूर्वेकडील चीनची आपणांस किती माहिती आहे याचा ज्याचा त्यानें विचार करावा. जागृत आशियाची तोंडओळख होण्यास तिकडे जाऊन धावत्या सफरी करुन परत आलेल्यांचीं प्रचारकी थाटाचीं भाषणें ऐकणें किंवा पत्रकें वाचणें पुरेसें होणार नाहीं. अशा प्रकारच्या पुस्तकांनीं कांहीं उत्सुकता वाढेल, आकर्षण उत्पन्न होईल, पण चीन वा अफगाणिस्तान यांच्या सम्यक् स्वरुपाचें ज्ञान होणार नाहीं. मध्य-आशियांत पाश्चात्त्य भांडवलवाले व आशियाई राष्ट्रें यांच्या नित्य चालू असलेल्या झगड्यांत नुसत्या सकृद्दर्शनीं झालेल्या पूर्वग्रहानें ही किंवा ती बाजू घेऊन चालणार नाहीं. महंमद पैगंबराच्या उदयापासून ते केमालपाशा किंवा झगलूलपाशा यांच्या कर्तृत्वापर्यंत तिकडील घडामोडींची माहिती भारतीय



अनुक्रमणिका






नागरिकास हवी आहे. अशा कामासाठीं इंग्रजींत 'Story of Nations' सारखी ग्रंथमाला उपलब्ध आहे. तिचें केवळ भाषांतर करून भागणार नाहीं. भारताचें सरकार परराष्ट्रांत वकिलाती स्थापन करण्यासाठीं बराच पैसा खर्च करतें व तो चालू राजकारणाच्या दृष्टीनें आवश्यकहि असेल. परंतु हिंद-अफगाणी संबंध एकमेकाची ओळख पटण्याच्या भक्कम पायावर उभारावयाचे असतील तर अशा वकिलाती स्थापून पुरें पडणार नाहीं. या वकिलाती आपले दैनंदिन राजकारणाचे डावपेंच लढवीत असतां त्याबरोबर येथील कांहीं तरुण अभ्यासक त्या त्या देशांत वास्तव्यासाठीं नेणें जरूर आहे. त्यांनीं रोजच्या राजकारणाच्या हर्षामर्षांत न पडतां पुस्तु भाषा शिकून व देशभर सामान्य विद्यार्थ्यांप्रमाणें हिंडून, तेथील विद्यापीठांत जाऊन, विविध मतांच्या लोकांशीं चर्चा करून, सारांश, अफगाणिस्तानच्या अस्मितेशीं समरस होऊन नंतर अफगाणिस्तानचा इतिहास भारतीय वाचकांसाठीं लिहिला पाहिजे. शेजारच्या देशांत नुसती प्रचारकी थाटाचीं शिष्टमंडळें किंवा सदिच्छामंडळें पाठविण्यापेक्षां तेथील विद्यापीठांत तद्देशीय संस्कृतीचें ज्ञान मिळविण्यासाठीं विद्यार्थी पाठविणें आवश्यक आहे. एकोणिसाव्या शतकांत भारतांत आलेले कांहीं कर्तृत्ववान् इंग्रज मुत्सद्दी हें कार्य करीत असत. एल्फिन्स्टन हा अफगाणिस्तानशीं वाटाघाट करण्यासाठीं गेला असतां त्यानें तेथील माहिती मिळवून अफगाणिस्तानचा इतिहास लिहिला. त्याचप्रमाणें सर जॉन मालकमनें इराणचा इतिहास लिहिला. इतकेंच काय परंतु भारतांत नोकरी करण्यासाठीं आलेल्या अनेक सिव्हिलियननांनीं आपल्या देशबांधवांस भारतीयांची ओळख करून देणारीं अनेक बरींवाईट पुस्तकें लिहिलीं. स्वातंत्र्योत्तर गेल्या पांच वर्षांत अनेक परराष्ट्रीय वकील परदेशांत जाऊन आले असतां त्यांच्यापैकीं किती लोकांनीं अशा प्रकारची सक्त मेहनत घेतली व आपली जबाबदारी पार पाडली याचा विचार करण्यासारखा आहे. कदाचित् आजच्या काळांत एका मनुष्यास अनेक अवधानें संभाळणें शक्य नसलें तर निदान परराष्ट्रीय विद्यापीठांतून भारताचे विद्यार्थी तद्देशीय संस्कृतीचें सम्यक् ज्ञान करून घेण्यासाठीं पाठविण्याची आवश्यकता आहे.

## इतिहास-परिषदेची इतिहासयोजना

इतिहासाच्या अभ्यासाकडे जबाबदारीनें लक्ष देणारी अशी भारतीय इतिहासपरिषद् इ. स. १९३५ सालीं स्थापन झालेली आहे व नुकतेंच गेल्या डिसेम्बरांत त्या परिषदेचें पंधरावें अधिवेशन ग्वाल्हेर येथें भरलें होतें. या पंधरा अधिवेशनांचा त्रोटक आढावा घेतल्यास थोडीबहुत प्रगति दिसून येते हें खरें असलें तरी अजून त्यांत सुधारणा होण्यास पुष्कळच वाव आहे. अशा प्रकारच्या अखिलभारतीय अधिवेशनांतून दिसून येणारा भपका, देखावा व औपचारिकपणा यांना इतिहासपरिषदहि अपवाद नाहीं. एकेका अभ्यासकानें आपल्या मर्यादित अभ्यासाच्या प्रश्नांवर फुटकळ संशोधनाचे निबंध वाचण्यापलीकडे या परिषदेच्या कार्याची मजल गेलेली नाहीं. परिषदेनें अखिल भारताचा इतिहास अनेक खंडांत लिहावयाचा संकल्प सोडून त्यासाठीं कांहीं लक्ष रुपयांचा निधि जमविला. त्यांतून कांहीं हजार रुपये खर्च होऊन अद्याप एकहि खंड वाचकांस वाचावयास मिळालेला नाहीं. या इतिहासाच्या संकल्पित खंडांत मराठ्यांच्या इतिहासास स्वतंत्र स्थान नाहीं. इतिहासपरिषदेकडून अखिलभारतीय इतिहासाचे जे निरनिराळे कालभाग पाडण्यांत आले आहेत ते लक्षांत घेतल्यास त्यावर इस्लामी वर्चस्वाची छाया पडलेली सहज दिसून येईल. सदरहू कालविभाग असेः (१) इतिहासपूर्वकालापासून इ. स. ७११ पर्यंत. (२) इ. स. ७१२-१२०६. (३) इ. स. १२०६-१५२६. (४) इ. स. १५२६-१७६४. (५) इ. स. १७६५ पासून आधुनिक कालापर्यंत. या कालविभागांचें नुसतें वरवरहि निरीक्षण केल्यास त्यांतील गैरप्रमाणशीरपणा दिसून येण्यासारखा आहे. प्रारंभींच्या सुमारें तीन हजार वर्षांच्या इतिहासाचा एक कालखंड कल्पून, १२०६ ते १५२६ च्या तीनशें वर्षांचा स्वतंत्र कालखंड कल्पिणें हें खरोखर असमर्थनीय आहे. मराठ्यांच्या इतिहासाची चवथ्या व पांचव्या कालखंडांत मिळून जी कुतरओढ होते तिचें वर्णन करण्याची तर सोयच नाहीं. अलिकडे भारत व पाकिस्तान हीं दोन राष्ट्रें झाल्यापासून या अखिलभारतीय अधिवेशनांतून मुसलमानी इतिहासकारांचा एक छुपा हल्ला वारंवार होत असतो. अल्लाउद्दीन खिलजी, औरंगजेब इत्यादि मुसलमान बादशहांनीं








केलेल्या अनन्वित कृत्यांचा निषेध तर राहोच पण त्यांचें समर्थन करण्याचा वारंवार यत्न होत असतो. भारत हें सेक्युलर राष्ट्र असलें तरी भारतांतील मुसलमानी इतिहासकारांची धर्मांधता कमी झालेली नाहीं. ती आतां अगदीं उजळ माथ्यानें वावरत नसली तरी तादृश सत्यान्वेषणाच्या बुरख्याखालीं ती वारंवार प्रकट होत असते. याचा पुरावाच हवा असेल तर ग्वाल्हेरच्या अधिवेशनांतील एका विभागाचे अध्यक्ष डॉ. महंमद हुसेन नायनार यांचें भाषण वाचावें. ते म्हणतात " भारतांत अनेक हिंदू जे मुसलमान झाले ते स्वखुषीनें होत. " दिल्ली किंवा आग्रा यासारख्या इस्लामी राज्यसत्तेच्या केन्द्राजवळच्या लोकवस्ती ही अद्यापहि बहुसंख्य हिंदू आहे ही गोष्ट मुसलमानांनी हिंदू लोकावर सक्ती केली नसल्याचा मोठा पुरावा म्हणून त्यांनीं दिलेला आहे. परंतु या तार्किक पुराव्याविरुद्ध मुसलमानी जबरदस्तीचे जे हजारों प्रत्यक्ष पुरावे समकालीन कागदपत्रांतून उपलब्ध आहेत तिकडे या विद्वन्-महाशयांनी सोयीस्कर रीतीनें डोळेझांक केली आहे. प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत इतिहासकारास पूर्वजांनी केलेल्या बऱ्या कृत्यांचें तसेंच वाईट कृत्यांचेंहि वर्णन करावें लागतें. या वर्णनांत खराखुरा प्रांजलपणा असणें आवश्यक आहे. मराठ्यांच्या इतिहासाचे अभ्यासक या बाबतींत कुणास हार जाणारे नाहींत. मराठ्यांच्या पराक्रमाचीं मराठ्यांनीं केलेलीं रसभरित वर्णनें मराठी वाङ्मयांत जितकी वाचावयास मिळतील तितकीच मराठ्यांच्या चुकांचीं कठोर वर्णनेंहि त्यांनीं केलेलीं आढळून येतील. परंतु सांगावयास खेद वाटतो कीं एकाहि मुसलमान इतिहासकारानें सुलतानी व मोंगली काळांतील राज्यकर्त्यांच्या धार्मिक सक्तीचा व धर्मांधतेचा कडकडून निषेध केलेला नाहीं. मध्ययुगीन काल हा धर्मभावनाप्रधान काल होता असें म्हणून या धर्मांधतेचें समर्थन करण्यांत अर्थ नाहीं. कारण धार्मिक बाबतींत उदारपणाचें व सहिष्णुतेचें धोरण मुसलमानांच्या आगमनापूर्वी भारताच्या इतिहासांत पानापानांतून आढळून येतें. भारतांतील मुसलमानी इतिहासकारांत हा प्रांजलपणा खरोखर दिसून न आल्यास भारतांतील अराष्ट्रीय वृत्ति नाहींशी झाली असें कदापि म्हणतां यावयाचें नाहीं.

### तयस्थ शास्त्रीय भूमिका

इतिहासाच्या लेखनास शास्त्रीय व तयस्थ अशा भूमिकेवर उभें राहून विचार करण्याची संवय होणें अत्यंत आवश्यक आहे. इ. स. १६५९ सालीं शिवाजी व अफझलखान यांच्यांत द्वंद्व झालें असेल, परंतु आज मराठ्यांच्या व मुसलमानांच्या वंशजांनीं प्रतापगडावर जाऊन खान नेमका कसा आला, शिवाजी-अफझलखान-भेट कोठें झाली, कोणाची सावधगिरींत कमतरता झाली इत्यादी गोष्टींचें विवेचन करणें व त्यासाठीं पुरावा गोळा करणें अवश्य आहे. त्यांत शिवाजी-अफजलखानविषयक द्वंद्वाचा उद्रेक होण्याचें कांहीं कारण नाहीं. खुद्द पानिपताची लढाई झाल्यानंतर अवघ्या पंधरा दिवसांत अबदालीनें नानासाहेब पेशव्यांस सांत्वनाचें पत्र लिहिलें, यांतील मर्म लक्षांत घेण्यासारखें आहे. इतर अनेक गोष्टींप्रमाणें वैरहि चिरंतन नाहीं. इतिहासकालीं दोन जमातींचें वैर असलें म्हणजे तें विद्यमान कालीं तसें असणारच असा सिद्धान्त काढणाराची इतिहासकारापेक्षां वेगळ्याच वर्गात गणना करावी लागेल. सारांश, सत्यसंशोधन व ऐतिहासिक वीरपुरुषांचा गौरव व भिन्न जमातींतील विद्यमानकालीन स्नेहभावाचे संबंध यांत वाटतो तितका विरोध नाहीं. जो थोडाबहुत विरोध आहे तो कमी होण्यासाठीं एकदोन दिशांनें यत्न करण्यासारखा आहे. इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत दीर्घकालीन वैर होतें. इंग्लिश इतिहासकारांनीं फ्रान्सच्या नेपोलियनला हीन लेखावें व फ्रेंच इतिहासकारांनीं त्यांच्या जोन ऑफ् आर्कचा इंग्लंडनें छळ केल्याबद्दल इंग्लंडचा निषेध करावा या प्रवृत्तीऐवजीं अलिकडे इंग्रज व फ्रेंच इतिहासशिक्षकांनीं एकत्र बसून, दुर्ग्रहास बळी न पडतां इंग्रज-फ्रेंच संबंधांच्या इतिहासाची मांडणी करण्याचें ठरविलें आहे. तसा प्रकार पुढेंमागें भारतीय व पाकिस्तानी इतिहासशिक्षकांस करावा लागेल. पण तें तूर्त संभवनीय वाटत नसलें तरी भारतांतील निरनिराळ्या प्रादेशिक विद्वानांनीं परस्परांच्या ऐतिहासिक संबंधांची सहकार्यानें छाननी केल्यास आपणामध्यें आंतिप्रांतीय अशी भारतीय दृष्टि उत्पन्न होईल व अशा दृष्टीची आंतरभारतीच्या वाढीस आवश्यकता आहे.

### संघर्षाऐवजीं सहकार्यावर भर हवा

भिन्न जमाती व समाज यांच्यांतील परस्परांमधील दुर्ग्रह कमी होण्यास आणखी एका दृष्टीनें यत्न होणें जरुर आहे. कोणत्याहि गोष्टीचें वर्णन करतांना कांहीं








निवडावें लागतें व कांहीं वगळावें लागते. आजपर्यंतचा मानवी इतिहास हा मुख्यतः मानवी घातपाताचा व संघर्षाचा इतिहास आहे; सहकार्याचा इतिहास नाहीं. संघर्ष किंवा झगडा हा लक्ष वेधूं शकतो, सहकार्याचें काम गाजावाजा न करतां चालूं असतें. प्राक्कालीन इतिहासाच्या वालुकामय मार्गावर संघर्षाचीं पावलें जशीं ठसठशींत उमटलेलीं दिसतात तशीं सहकाराचीं दिसत नाहींत. विद्यमानकालीन गरजा लक्षांत घेऊन इतिहासाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोणच बदलला पाहिजे. इतिहासकार हा पक्षपाती नसावा, परंतु त्यास आपला असा एक दृष्टिकोण असावा असें पं. जवाहरलाल नेहरूंनीं दिल्ली येथील इतिहास-परिषदेच्या अधिवेशनाचें वेळीं उद्घाटन करतांना म्हटलें होतें. तेराव्या शतकांत अल्लाउद्दीन खिलजी उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत जाळपोळ करीत असतां रामानंद आपलें वैष्णवमताच्या शिकवणुकीचें कार्य शांतपणें करीत होता. अल्लाउद्दीन आला आणि गेला, परंतु रामानंदाची शिकवण भारतीय स्वभावरचनेंत टिकून राहिली आहे. तथापि, दुर्दैवाची गोष्ट अशी कीं भारताच्या इतिहासांत अल्लाउद्दीनाच्या तथाकथित पराक्रमास पृष्ठेंच्या पृष्ठें मिळत असतां रामानंदास उणेंपुरें पृष्ठहि लाभत नाहीं. हा इतिहासलेखनाचा सदोष प्रकार यापुढें असाच चालू राहणें इष्ट नाहीं.

केवळ भारताच्या इतिहासांतच नव्हे तर इतर देशांच्या इतिहासावरील पुस्तकांतहि मानवी कर्तृत्वाच्या हकीकतीपेक्षां मानवानें केलेल्या विध्वंसाचेंच वर्णन अधिक तपशीलवार केलेलें आढळून येईल. लढाया, तह, एकमेकांविरुद्ध लढविलेले डावपेंच, झालेलीं खलबतें, केलेलें आक्रमण, त्याविरुद्ध होणारा प्रतिकार, आक्रमणाचे दुष्परिणाम वगैरे वगैरे गोष्टींनीं इतिहासाचीं पृष्ठें भरून गेलीं आहेत. इतिहासाचे शिक्षक मुलांस प्रश्न विचारतांना "मोंगली सत्तेचा किंवा मराठी सत्तेचा नाश कां झाला याची कारणमीमांसा द्या" असा प्रश्न विचारतात. "मोगलांचें किंवा मराठ्यांचें राज्य दीड-दोनशें वर्षें कसें तगलें, तें टिकून राहण्याचीं कारणें कोणतीं, त्यांचें विधायक कर्तृत्व कोणतें" असा प्रश्न विचारण्याचें सुचत नाहीं. कारण इतिहासाकडे त्या दृष्टीनें पाहण्याची दृष्टीच नाहीं. पानिपतावर सदाशिवराव भाऊचा पराभव कां झाला याची मीमांसा एतद्देशीय व परकीय इतिहासकारांनीं पृष्ठेंच्या पृष्ठें केली आहे व ती उपयुक्त नाहीं असें नाहीं. पण उणेंपुरें पन्नास हजार सैन्य दक्षिणेस पटदुरापासून उत्तरेस पानिपतापर्यंत सुमारें ९०० मैलांच्या अंतरावर दरकूच दरमुक्काम करीत कसें जाऊन पोहोचलें, त्या हालचालींमागें कोणती योजक संघटना होती याबद्दलचा विचार करण्याचें कुणी लक्षांत घेत नाहीं. असेंच अहल्याबाईबद्दल सांगतां येईल. सुमारें अठ्ठावीस वर्षें ती रांगड्या प्रदेशांत राज्य करीत असतां तिनें पेशव्यास किंवा शिंद्यास कसें साह्य केलें किंवा विरोध केला याचें वर्णन इतिहासांत सांपडतें. परंतु तद्देशीय समाजांत ती मिसळली किंवा नाहीं, राजपुतांचीं लग्नकार्यें, त्यांचे सणवार, सामाजिक उत्सवाचे प्रसंग या सर्व गोष्टींत ती समरस होत होती किंवा नाहीं या विषयाकडे अभ्यासकाचें जावें तसें लक्ष जात नाहीं. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत जगाचा इतिहास मानवी सहकार्यानें घडवावयाचा असेल तर इतिहास-लेखकानें भूतकाळांतील मानवी कर्तृत्वाच्या विधायक बाजूकडे अधिक लक्ष देणें उचित होईल. सहकारापेक्षां संघर्ष हा अधिक आकर्षक व चित्तवेधक असतो व लढायांचीं वर्णनें जितकीं लक्षांत राहतात तितके सहकाराचे तपशील मनावर ठसणार नाहींत हें खरें. परंतु जें चित्तवेधक तें इष्ट असें कुणीच समर्थन करणार नाहीं.

याचा अर्थ असा नव्हे कीं इतिहासकारानें इतिहासाच्या एका अंगाकडे मुद्दाम दुर्लक्ष करून दुसऱ्या अंगाचा विस्तार करावा. इतिहासकार हा पक्षपाती असतां कामा नये हें वर म्हटलेंच आहे. विशेषतः पक्षभेदांवर अधिष्ठित अशा लोकशाहीच्या काळांत इतिहासकारानें उगवत्या सूर्यास नमस्कार करण्याच्या प्रवृत्तीपासून दोन हात दूर राहिलें पाहिजे. नाहींतर मोठाच अनवस्थाप्रसंग ओढवेल. हिंदुमहासभावादी पक्ष अधिकारारूढ झाल्यास शिवाजीस हिंदुत्वाचा प्रतिनिधि बनवावें, समाजसत्तावादी पक्ष अधिकारारूढ झाल्यास त्याच शिवाजीला जमीनदाराविरुद्ध शेतकऱ्यांचा पुढारी बनवावें व काँग्रेसच्या राजवटींत भूतकालीन हिंदुमुस्लीम संघर्ष डोळ्याआड करून त्यांच्या ऐक्याची गोड गाणीं गावींत असा उन्हाळी–पावसाळी कार्यक्रम शिक्षणप्रांतांत सुरु झाल्यास शिक्षकांचे व विद्यार्थ्यांचे हाल होतील! प्लीनी हा रोमन इतिहासकार












म्हणतो : "आपण जर या किंवा त्या व्यक्तीस खूप करण्यासाठीं आपला इतिहास रंगवूं लागलों तर मग इतिहासकार व राजकारणी मुत्सद्दी यांच्यांत फरक तो काय राहिला ?" प्लीनीनें वरील वाक्यांत राजकीय मुत्सद्यांवर जो वर्मी प्रहार केला आहे तो भर्तृहरीच्या 'नृपसज्ञानि नाम के वयं' या प्रश्नाइतकाच झोंबणारा आहे यांत संशय नाहीं. परंतु त्यांत सत्यांश आहे. इतिहासलेखक म्हणजे बदलत्या राजकारणाच्या तारेवर कसरत करून मनोरंजन करणारा डोंबारी नव्हे. कालाच्या गरजेस व मानव्याच्या प्रगतीस इष्ट अशा प्रकारचा दृष्टिकोण त्यांस असला पाहिजे. पण त्यानें पक्षपाती असतां कामा नये. या विधानांत वरवर दिसतो तितका खरोखर विरोध नाहीं, हें वरील विवेचन वाचणाराच्या लक्षांत येण्यासारखें आहे.

### इतिहासलेखनाची पद्धति

भारतांत इतिहासलेखन सापेक्षतया अलीकडचें असलें तरी युरोपांत आज तें दोन-अडीच हजार वर्षांइतकें जुनें आहे. इ. स. पूर्वी ५ व्या शतकांतील आद्य ग्रीक इतिहासकार हिरोडोटसपासून विद्यमान इंग्रज इतिहासकार अर्नोल्ड टॉयनूबीपर्यंत जे अनेक इतिहासकार होऊन गेले, त्या सर्वांनीं एकाच सांच्याचा इतिहास लिहिला आहे असें नाहीं. कुणी विभूतिप्रधान इतिहास लिहिला, तर कुणी ईश्वरीसंकल्पप्रधान अशा प्रकारच्या मानवी घटिताचें वर्णन केलें; कोणाची दृष्टि भौतिक होती तर कुणाची आध्यात्मिक होती; कुणी वर्गसंघर्षावर भर दिला तर कुणी संस्कृतिसंघर्षावर भर दिला. आणि या सर्वांच्या लेखनांत उत्तरोत्तर प्रगति झाली आहे. आजचें इतिहासलेखन हें मागील अनेक इतिहासकारांच्या लेखनपद्धतीचा परिपाक होय. सारांश, इतिहासलेखनासहि इतिहास आहे. मराठी भाषेंत एतद्विषयक वाङ्मय अतिशय कमी आहे. सुमारें ७८ वर्षांपूर्वी कै. प्रा. पुणतांबेकर यांनी दत्तोपंत आपटे-स्मारकग्रंथांत या विषयावर एक शंभरसवाशें पानांचा निबंध लिहिला आहे. परंतु तो आज जंत्रीवजा व तांत्रिक वाटतो. जगांतील इतिहासकारांच्या इतिहासविषयक कल्पनांचा अभ्यास स्वदेशाचा इतिहास समृद्ध करण्यास उपयुक्त होईल. कारण त्या योगें एखाद्या मानवी घटिताची ठराविक सांच्यानें उपपत्ति लावण्याच्या प्रवृत्तीस आळा बसेल. इतिहासलेखनांत एक प्रकारचा ठराविकपणा येत चालला आहे. जें कांहीं घडलें तें जणुं कांहीं अपरिहार्यच होतें, जें घडलें नाहीं तें घडूं शकणार नव्हतें अशा प्रकारची घडलेल्या गोष्टींचें समर्थन करण्याची लेखनपद्धति इष्ट नाहीं. इतिहासकारास मानवी घटिताची हरएक प्रकारांनीं मीमांसा करण्याची संवय पाहिजे. कोठल्याहि घटितामागें जे घटकावयव असतात त्या घटकावयवांची एकाहून अनेक प्रकारांनीं जुळणी होऊं शकेल व एका विशिष्ट घटिताचा एकाहून अधिक प्रकारांनीं अन्वयार्थ लावतां येईल ही विचारांतील ममिांसक वृत्ति इतिहासकारांत उत्पन्न होणें जरूर आहे. अर्थातच इतिहासकारांनीं केलेल्या विविध मीमांसेपेक्षांही एखादी निराळीच मीमांसा खरी असूं शकेल, नाहीं असें नाहीं. परंतु मानवी घटिताची शांतवृत्तीनें मीमांसा करण्याची संवय हा इतिहास-अध्ययनाचा सर्वांत मोठा फायदा होय. अशा प्रकारचा मीमांसक समाजप्रकृतीचें निदान करणारा ठरतो. त्याकडे लोक उत्सुकतेनें पाहातील. इतिहासकाराची भूमिका ही एक प्रकारें रसायनशाळेंतील प्रयोग करणाऱ्याप्रमाणें आहे. फरक एवढाच कीं प्रयोगशाळेंत काम करणारास निरनिराळीं द्रव्यें एकांत एक मिसळून त्याचा काय परिणाम होतो हें पाहतां येतें. याच्या उलट इतिहासकारापुढें जगांतील विविध देशांत विविध कालीं घडलेले प्रयोग घटित रूपानें नजरेसमोर असतात व त्यांची उपपत्ति लावण्याचें काम त्याजकडे असतें. ही प्रायोगिक वृत्ति इतिहासाच्या अभ्यासानें वाढत गेल्यास इतिहासकार हा मानवी समाजाचा मार्गदर्शन करणारा ठरेल. इतिहासकारास भविष्यकाळीं नेमकें काय घडेल हें सांगतां येणार नाहीं. भविष्यकाळ हा इतिहासाचें कार्यक्षेत्रच नव्हे; परंतु डोळ्यासमोर दिसणाऱ्या परिस्थितींत कोणकोणत्या भिन्न प्रकारांनीं घटना घडण्याचा संभव आहे हें इतिहासाच्या अध्ययनामुळें त्यांस अधिक चांगल्या रीतीनें सांगतां येईल. मानवी इतिहास हा अकल्पित घटनांनीं घडलेला आहे. इतिहासाची पुनरावृत्ति अगदीं जशीच्या तशी होत नाहीं, होणें शक्यहि नाहीं. परंतु घटनेची मीमांसा करण्याची संवय व सामर्थ्य वाढीस लावणें हें प्रौढदशेंतील इतिहासाच्या अध्ययनाचें सर्वांत मोठें कार्य होय.

डॉ. सरोजिनी बाबर

# मला भेटलेले " ज्ञानदेव आणि तुकाराम "

" माझा मराठाचि बोलु कवतुकें । परि अमृतातेंहि पैंजा जिंके । ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ "

" साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवीं देशियेचिया आक्षोणी । विवेकवेलीची लावणी । हों देईं सैंध ॥ "

" मऱ्हांटियेचां नगरीं । ब्रम्हविद्येचा सुकाळु करीं । घेणें देणें सुखाचि वरी । हों देईं या जगा ॥ "

गीतेमधील महान् तत्त्वज्ञान बहुजनसमाजाला सांगण्यासाठीं देशिकार लेणें तिजवर चढवून मराठीचें वैभव सांगणाऱ्या या ज्ञानदेवांच्या ओव्यांचा अर्थ मनाशीं लावतांना माझ्या मनांत अनेकदां यायचें कीं, आपण एकदां आळंदीला जाऊन यावें. तेथें गेलें म्हणजे मराठीचें सामर्थ्य दर्शविणाऱ्या या महान् साहित्यिकाचें दर्शन आपणाला घडेल अशी माझी समजूत. आळंदीच्या परिसरांतून वावरतांना ज्ञानदेवांच्या चरणधुळीनें पवित्र झालेल्या मातीचा आणि त्यांस स्फूर्ति देणाऱ्या त्या विशिष्ट स्थलकालामधून वाहणाऱ्या वाऱ्याचा स्पर्श झाला कीं, ज्ञानदेवाची ओळख पटायला जड जाणार नाहीं अशी भोळी समजूत मनांत ठाण मांडून बसलेली. तिथल्या सोन्याच्या पिंपळाखालीं गेलें अगर समाधीच्या निकट सहवासांत आपण उभें राहिलें तर त्या विशिष्ट स्थळाच्या सान्निध्यानें मनाला कांहीं नवीन साक्षात्कार घडेल असा भोळा भाव एकसारखा डिंवचत असलेला. त्यामुळें आळंदीला जाऊन यायचेंच असा निश्चय करून मी एकदां आळंदीच्या वाटेला लागलें.

पुणें सोडल्यापासूनच ' ज्ञानदेवा तूं कुठें आहेस ? ' या एकाच गोष्टीचा मनाला ध्यास लागलेला. ज्ञानदेवांनीं लिहिलेली ज्ञानेश्वरी आपली आपण वाचीत बसण्यापेक्षां ती इतर कोणीतरी तिथें वाचून दाखवावी आणि मग त्या अजाण वृक्षाच्या सावलीत बसून ज्ञानदेवीचा त्यानें सांगितलेला आणि आपला अर्थ जुळतो आहे कीं नाहीं हें कदाचित् ज्ञानदेवाच्याच तोंडून ऐकण्याचा चमत्कार घडला तर पहावा असा विचार मनाला सारखा स्पर्श करून जात होता....पंढरपूरची वारी आटोपून आळंदीकडे धांव घेणाऱ्या वारकऱ्यांच्या घोळक्यांत मिसळून ज्ञानदेवाची निराळी ओळख घडते का पहावी म्हणून मी त्या मंडळींच्या समवेत हळुहळू चाललेली. इतक्यांत एका जख्ख म्हाताऱ्या बाईनें आपल्या हातांतील भगवी पताका नीट सावरीत आणि टाळ वाजवीत पद सुरू केल्याचा मागच्या बाजूनें आवाज आला. स्वाभाविकपणें मी मान मागें वळवली आणि पहातें तों चारचौघीजणी अतिशय आनंदानें एक पद म्हणत होत्या :

वैकुंठावरुनि घेतलीं धावु ।<br>
चंद्रभागातिरी पंढरी जाऊ ॥<br>
कुंडुलिकाचा पाहुनी भाऊ ।<br>
मायबापाची करितो सेवू ॥<br>
भिरकाविल्या इटवरी ।<br>
उभा ऱ्हारे माज्या देवा ॥<br>
सावळा उभा पाहिला बाई ।<br>
पुढं समाधिमागं इट्टलरखमाई ॥<br>
चंदु बानूबा भैन मुक्ताई ।<br>
पुढं समाधिमागं इट्टलरखमाई ॥<br>
आळंदी गांव इंद्रावनी तिरी ।<br>
तितं वैष्णवाचीं बाळकं चारी ॥<br>
अवतार पांडुरंग नांव ज्ञानेश्वर ।<br>
करी घडामोड । जग उद्धाराया ॥<br>
निवरती सोपानकाका भैन मुक्ताई ।<br>
पुढं समाधिमागं इट्टलरखमाई ॥

एकनाथ हे मुंगी-पैठण ।
वत्तीवाल घालुनी बामन ॥
चांगदेव आले येवगी होऊन ।
जासुदाच्या हाती दिले पत्र लिहून ॥
मुक्ताईनें ग पाहिलं वाचून ।
अजुनि नाहीं गेली चांग्या तुजी भरांती ।
निवरती सोपानकाका भैन मुक्ताई ।
पुढं समाधिमागं इट्ठलरखमाई ॥
चौघं भावांडं करीती विचार ।
तोंड धुयाला बसले भिंतीवर ॥
निर्जीव भिंत चाले सत्वर ।
चांगदेव पहाता पडे धरनीवर ॥
निवरती सोपानकाका भैन मुक्ताई ।
पुढं समाधिमागं इट्ठलरखमाई ॥

टाळांच्या खणखणाटांत, समाधानाच्या भरांत आणि उत्साहाच्या तालांत गाइलें जाणारें हें पद ऐकून मला माहीत असलेली आळंदीची माहिती खरी असावी असा अंदाज आल्यामुळें मी एका त्यांतल्याच बाईला विचारलें, " तुम्ही किती वेळां आळंदीला गेला होतां हो ?"

त्यावर ती हंसली आणि म्हणाली, " लाखडाव ! "

" खरंच ? "

" मंग ? खोटं वाटलं ? "

" इतक्या वेळां कशालां ? "

" मंजी ? माज्या लाडक्या ग्यानूबालां भेटायला ! "

" तुम्हाला ज्ञानदेवाचें दर्शन घडलें ? "

" आलबत् ! "

" कुठें आहे ज्ञानेश्वर ? "

" साऱ्या आळंदींत आनिक आमा वारकऱ्यांच्या हुरद्यांत ! " असें ठासून उत्तर देऊन ती बाई माझ्याकडे निरखून बघूं लागल्यामुळें मी माझी नजर खालीं वळवली. इतक्यांत तिच्या शेजारची दुसरी बाई पुढें होऊन म्हणाली, " तुमी कंदी गेला न्हाई ? "

" नाहीं ! आजच चाललें आहें. "

माझें हें उत्तर त्या बाईला आवडलें नाहीं असें तिच्या चेहऱ्यावरून ताडल्यामुळें मी तिला कांहीं सांगणार तों तीच म्हणाली " आमच्या ग्यानूबाचं दर्शान घडलं कीं सारी ध्याई पवितर हून जातीया मानसाची ! अवो, काय सांगू तुमाला ग्यानूबाची गोष्ट ! —

' पांडुरंग बाई म्हन ' देग रुक्मिनी धोतार
दिंडी आली ग्यानूबाची त्याला जातो मी सामोर '
अनिक तुम्ही अजून एकडाव बी गेला न्हाई मजी काय शानपंना झाला ? "

प्रत्यक्ष पंढरपूरचा विठोबा ज्याला सामोरा जायला उतावीळ होतो त्या ज्ञानदेवाचें दर्शन मला अजून घडलें नव्हतें हें मी तिला कोणत्या तोंडानें सांगूं ? मी आपली त्या बाईपासून भरभर पुढें निघालें आणि ज्ञानदेव कुठें भेटेल, कसा दिसेल या विचारांत पावलें टाकूं लागलें. पण त्या बाईनें पुढें येऊन लगबगीनें मला गांठली आणि सांगितलें, " माजं ऐकून तरी घे. आळंदीची गोष्ट नीट ऐक मजी तितं गेल्याव भिरीभिरी नजर टाकून तूं कावरीबावरी हुयाची न्हाईस ! " आणि लगेच ठेक्यांत पावलें टाकीत तिनें माझी संमति मिळायच्या आधींच सुरवातहि केली:—

' चल सये बाई उचल पाऊल लगलग
ग्यानदेव सका माजा सये भेटल जिवलग
काय सांगू सये आळंदीची ग रचना
बैसले ग्यानदेव नामा करीतो कीर्तना
दारीं सोनियाचा पिंपळ पाठीशी ग इंद्रायनी
ग्यानदेव समाधित बाई, बसला येऊनी
भर्ताराच्या शिरावरी आळंदी ग कर, नारी
सोन्याचा पिंपळ देवा ग्यानूबाच्या दारी
दुरून वळकिती इंद्रायनीला न्याहार
आळंदी बाई गांव साधुसंतांचं म्हायार '

" आनिक काय सांगू पोरी माज्या ग्यानूबाची किरीत ! ऐक. नीट चित देऊन ऐक. न्हाईतर माज्यावानी गत हुयाची ! एक डाव काय गंमत झाली बग—

' पंढरीला गेली आळंदीला गेल चित्त
देव माजा ग्यानूयोबा काग म्होर अवचित '

व्हय ! आतां दिकुन याचा म्होर अवचित ! आन् त्योका एकडाव भेटला का मग कुटलं आलंया काय ? ...हं तर मी काय म्हनीत हुते ? आलं ध्येनांत—

आळंदी बसविली एरंड--धोतऱ्यानी
समादि घेतली बाई ग्यानूबा खेतऱ्यानी...... "

" म्हणजे " त्या बाईला मी एकदम हाताला धरून मागें खेचली. तिनें ज्ञानदेवाचा क्षत्रिय म्हणून केलेला उल्लेख ऐकून मला विलक्षण आश्चर्य वाटलें. म्हणून मी तिला सांगितलें, " अहो बाई, ज्ञानदेव कांहीं क्षत्रिय नव्हते ! ब्राम्हण होते ते ! "










त्यावर ती बाई माझ्या हाताला हिसडा देऊन म्हणाली, " हं ! तुला ठावं का मला ? अग—

आळंदीच्या माळावरी कुनी सुपारी फोडिली
संग देवा गेनूबाच्या सये बारस सोडिली

एवडं मला म्हाईत ! त्यो बामन हाय का खेत्री हाय हयेची पंचात करायचं कारन ? तुमा लिनाऱ्यास्नी नसती उठाठेवच लई ! . . .त्यें खरंखोटं तुजं तूं बगून घे. आदी माजं ऐक." त्यामुळें मी तिच्याकडे 'आ' वासून बघूं लागलें. 'मी वाचलें होतें त्याची दिक्कत न बाळगणारी ही बाई कोणी संशोधक तर नसेल ?' असा विचार मनाला चाटून गेला. म्हणून मी तिला कांहीं-तरी विचारावं म्हणून तोंड उघडणार एवढ्यांत तिच्या शेजारची दुसरी म्हातारी बाई माझ्या तोंडाकडे टक लावून पहात म्हणाली, " आतां ऐक मी काय सांग-तीया तें. काय ? मदी मदी त्वांड घालू नग. " आणि पदरानें तोंड पुशीत तिनें हातांतील टाळ एकमेकांवर आपटीत मला सांगितलें:

" पाऊस पडीयीतो पंडरीच्या माळावरी
ग्यानूबा नामदेव माज भिजल वारकरी
पांडुरंग म्हने ' ऐक रुक्मिनी झनत्कार
हातीं वीना टाळ आले बग ग्यानेश्वर'. . . . ."

आणि यावेळीं मोठमोठ्यानें टाळ वाजवीत तिनें मला बजावलें, " माजा गेनूबा सादा देव न्हाई. अग, त्यो पंडरपुरांत पावना आल्यावर इट्ठलालाच काय पन साऱ्या गांवाला काळजी ! गवळनी एकमेकींत म्हन-त्यात्या–

' गेनूबा देव पावणे ऐक सये सांगनी
आतां घालू नगा लई दुधाला धारवनी '

तर एकदां वारकरी गंद उगळताना दमला मजी गेनूबारायालाच म्हनतूया—

' चंदन मैलागिरी उगाळीता गेल दंड
गेनूबाराया माज्या माज्या झग्याच सोड बंद '

अनिक माळनीची तारांबळ तर इच्यारूच नगस–

' पंडरपुरीच्या ग माळनी बाई उंच उंच काठ्या
ग्यानदेवाच्या पालखीला बांदती फुलाच्या ग काठ्या '

आन् असा ह्यो माजा गेनूबा न् त्येची आळंदी कशी ? ऐक त्येबी सांगतें—

'हावस मला मोठी आळंदीला ग जायाची
शेंडीचा नाऱ्योळ इंद्रावनीला व्हायाची '

अग पन का ? तर—

' आळंदी वसविली चाकनाच्या वाकनाला
गेनूबा देव उबा सादू जमला कीर्तनाला
इंद्रावनीच्या कडला सव्वा खंडीचं पुरान
संत बसलं जेवाया तुपा भरल दुरान '

अशा येळला माज्या ग्यानूबाला दिष्ट हूनी म्हन नाऱ्योळ व्हायाचाग !

त्या बाईची ही भक्ति पाहून माझें अंतःकरण एवढें उचंबळून आलें कीं, त्या क्षणाला आमच्या गु. प्रा. सोनोपंत दांडेकरांनी आम्हांला ज्ञानेश्वरी समजावून सांगतांना " एकदां आळंदीची वारी केल्याशिवाय ज्ञानदेव खरा समजणं कठिण ! " असें कांहीं म्हटल्याचें आठवलें. तसें म्हणतांना हजारों वारकऱ्यांच्या मेळाव्यांत सांपडणाऱ्या आगळ्या आनंदाचें त्यांनीं केलेलें रस-भरित वर्णन कानांत घुमूं लागलें. . . . .

' 'बाई, ज्ञानदेवावर एवढं तुमचं प्रेम ? " भावना-तिरेकानें भारून गेलेल्या माझ्या तोंडातून हा आवाज उमटला. तशी ती बाई माझ्या डोळ्यांत निरखून पहात म्हणाली, " पुना तेंच ! एकडाव आमी आमचं काळीज त्येच्या पायाव घातलंया ! त्यें काय त्येच्यापसन दूर हुयाला व्हय ? आमाला बगितल कीं, त्येच हुरदं मोकळं हुतंया आन् त्येला बगितलं की आमचं भरून येतं या !

' इंद्रावतीच्या ग काठायाला
झाडं तुळशीचीं हालत्याती
देवबी ग्यानूबोबा
सादु समाधि बोलत्याती '

अशी हाय आमची दिष्ट भेट ! "

तिचे हें बोलणें ऐकून मी थक्क झालें. सर्वसामान्य माणसाला पचेल व कळेल असें गीतेवरील भाष्य कर-णारा ज्ञानदेव एवढा लोकप्रिय झाल्याची नवीन साक्ष मिळाल्यानें त्यानें केलेल्या कार्याचें खरें चीज झालें अशी माझ्या मनाची खात्री झाली. एवढेंच नव्हे तर गीतेसारख्या ग्रंथाचें सेवन करण्याची रीत

" जैसें शारदीयेचे चंद्रकळे ।
माजि अमृतकण कोंवळे ।
तें वेचिती मनें मवाळें ।
चकोर तलगे ॥



अनुक्रमणिका








तया परी श्रोता ।
अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण चित्ता ।
आणुनियां ॥ ”–अ. १. ५६–५७

अशी सांगणाऱ्या ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी अर्थ न समजून घेतां केवळ श्रद्धेनें वाचणाऱ्या लोकांच्या भाविक मनांत त्यांच्याबद्दल वसत असलेला अमर्याद आदर नि प्रेम बघून मला गहिंवरून आलें. आणि त्या क्षणाला–

“ तो शांतुचि अभिनवेल ।
ते परियसा मऱ्हाटे बोल ।
जे समुद्राहूनि खोल ।
अर्थभरित ॥
जैसें बिंब तरी बचकेंएवढें ।
परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।
शब्दांची व्याप्ति तेणें पाडें ।
अनुभवावी ॥ ”

( अ. ४. २१४–२१५ )

या ज्ञानदेवाच्या ओव्या ओठांवर घोळूं लागल्या. मी माझ्याच विचारांत दंग होऊन गेलें... पण तेवढ्यांत आम्ही ‘ विसाव्या ’ पाशीं येऊन ठेपल्यामुळें ती बाई मला गदगदा हालवून म्हणाली, “ आतां वाईच टेक हितं. आनिक पुना कान दे माज्या शब्दाला. ” त्यामुळें भानावर येऊन मी म्हणालें, “ बोला. मी ऐकतें. ”

“ हं ! म्हन ऐकतें ! तूं बोल कीं ! ”

“ मी काय बोलूं ? ”

“ मजी ? टाव न्हाई काय बोलायचं त्ये ? नुसतं माज्या गेनूबाची याद आली तरी लह्या फुटाव्या तशा आमी म्हनाय लागतूया—

‘देवबी ग्यानूबा त्यांड धुतो इंद्रावनीच्या झऱ्याला
मुक्ताई ग त्येची भैन मोती गुपीती तुऱ्याला
आळंदीचा ग पार देवा ग्यानूबाला साजू
त्येच्या आंगुळीला इंद्रावनी ग डाव्या बाजू
देहूचा मासा बाई आळंदीला आला कसा
देवा माज्या गेनूबाचा सये सादूचा नेम तसा
नगर परदक्षिना तुला घालीते नेमानी
समादि गेनूबाची मी का पहाते वातीनी
चांगदेव आले झाले वाघावरी स्वार
ज्ञानोबारायाची ग भिंत चाले झरझर
चांगयाचं पत्तर कोरा कागद केली घडी
देती उत्तर गेनूबा लाभे मोकूक्षाची ऐलथडी’

पर माज्या ग्यानूबाला एकल्याला घरचं परपंचाच सुक नव्हतं बग पोरी ! कुनी काय म्हटलं कीं, हंसतमुकानं म्हनावं—

‘गेनूबा देव बोल मला कशाला व्हवी शेज
भैनी माजे मुक्ताई पाठीशी तूं माज्या नीज
गेनूबा देव बोल मला कशाला व्हवी रानी
भैनी ग मुक्ताई आंगुळीला देग पानी

त्येचं सारंच निराळं बग ! त्येची सर तुमाआमाला यील म्हनतीस काय ? न्हाई ग बाई !... ”

ती बाई बोलायची थांबली तरी मी मान वर केली नाहीं. मला वाटलं ती आणखी बोलेल, क्षणभर तिनें विसांवा घेतला असेल. म्हणून मी ती आणखी काय सांगणार हें मनाशीं आजमावतां आलें तर पहात होतें, तोंच मघांची ती म्हातारीबाई माझा हात धरून उठवीत म्हणाली:

‘चल सये लवकर नग करूस घोटाळा
गेनूबा सांगी आरथ ऐके मुक्ताई चित्कळा’

“ आन् उशीर करून कसं भागल ! चला चला बिगी बिगीनं !... ” त्यामुळें मी एखाद्या जादूनें भारून जावी तशी उठलें आणि तिच्या तोंडाकडे पहात तिच्या पावलावर पाऊल टाकलें...दुरून दिसणाऱ्या आळंदीकडे टक लावून पहात मी पुढें चाललें. पण मला डिंवचून माझें लक्ष आपल्याकडे खेंचून घेत ती म्हातारी म्हणाली, “ वाईच पताका घे ही हातांत ! बगू बरं कशी दिसतीयास ? म्होरच्या वारीला अशा झोकांत आली पाइजेस ! ”

“ पण... ” ती पताका हातांत धरतांना एकाएकीं मला कसेंसेंच वाटलें म्हणून मी अडखळलें तशी ती हंसून म्हणाली, “ अं ! अशी बिचकतीस का म्हन ! देवाची पताका घेतांना मेली कसली लाज ? ” आणि तिनें ती पताका खसकन् ओढून आपल्या हातांत घेत मला सांगितलें, “ आमी अशा वारीला निघालों मजी लई मज्जा येतीया. ‘ ग्यान बा तुका ’ करीत आमी आपल्या आपुन म्होरं म्होरं सरकतो अक्षी. कंदी कटाळा न्हाईच. संग गेनूबा आन् तुकाराम ! कटाळा यीलच कसा ?












'बारा भुयाची पालकी वर मोत्याचा आईना
आल ग्यानूबा तुकाराम दिंडी पुन्यांत माईना '

असं एकडाव पुन्यांत झालं कीं लागली बाटला ! मंग तर लई मज्जा—

'ग्यानूबा पालकीत तुकाराम घोड्यावरी
दोनीची एवडी हुती भेट वाकुऱ्या वड्यावरी
ग्यानूबा तुकाराम आळंदीच देसमुक
दोगांच्या आंगुळीला इंद्रायनी समाईक
पंढरीची वाट आडवा वाकूर गांव खेड
ग्यानूबा तुकाराम तत सादूचा तळ पड
वाकुऱ्या वड्यावरी झाल फुलांचं हातरून
ग्यानूबा तुकाराम कुट गेल्याती उतरून

अशी हवा बगून नुसती तारांबळ उडतींया. दोन वाटन दोन पालक्या जात्यात पंढरीला. आपुन कुनाबरबी जावावं. "

कोणत्या पालखीबरोबर वारीला जायचें याचें महत्त्व मला विशेष न वाटल्यामुळें मी त्या बाईला तसें कांहीं उत्तर न देतां कांहींशा कुतूहलानें विचारलें, " आळंदीची गोष्ट संपली आणि आतां तुकारामाची सुरू झाली कीं काय?" त्यावर गालांतल्या गालांत हंसून पदर दांताखालीं धरत ती म्हणाली "अगबाई, ग्यानूबा म्हटला कीं तुका याचाच ! आतां आळंदीची वाट कापतूया म्हन आळंदीची गोष्ट. तितनं आमी देहूला जानार तवा तुकाची याद याची कशी न्हाईल ? "

" आळंदीपासून देहू किती लांब आहे हो ? "

" मजी ? देहूलाबी गेली न्हाईस कवा तूं ? "

" नाहीं ! पण आतां जाणार आहे "

" बघा बाई ! अग, आळंदी सोडली कीं देहूच ! "

" म्हणजे ? ...... दोन्ही गांवं... "

" हां, दोनी अगदीं जवळ जवळ ! त्येचं असं हाय—

'आळंदीपासूनी देहू हाई टप्प्याखालीं
फुलाच्या पाटीनं ग माळीन चालली झोकाखालीं '

गेनूबाला फुलं व्हाईली कीं तुकाला फुलं धिऊन माळीन झोकांत निगतीया टाकोटाक ! "

" देहूला विशेष असं काय आहे, आजीबाई, बघण्यासारखं ? " मला त्या बाईकडून तुकाराम जाणून घ्यायचा होता म्हणून आळंदीचें चित्र मनासमोर येत असतांनाच मीं तिला प्रश्न केला. त्यावर कांहींशा अभिमानानें भुंवया उंचावीत तिनें सांगितलें—

"आळंदी करूनी मला देहूला जायाचं
लाल पिंजरीचं कुंकूं माज्या बाळीला ग्यायाचं
आळंदीपासूनी देहू जवळ सांगती
गेनूबा तुकाराम एका तर्फला नांदती

तवा हिंत हाय तेंच तिथंबी. देवदेव केला कीं आमचं काम झालं ! देवाला भेटाय जायाचं का ततं काय काय हाय बगायला जायचं ? काय ? "

" हो. देवाला तर भेटायचंच. पण आपलं विचारलं. आणि ज्ञानदेवासारखंच तुकारामाचं पण सगळं काही ? "

" तसं कसं ? तुकाराम तुमाआमासारका संसारी मानूस. त्येची गोष्ट लई निराळी गेनूबापरास ! "

" म्हणजे कशी ? "

" दोगास्नीबी इट्ठलाचं याड सारकच. मजी—
'आवडीचा देव तातडीच्या गाठीभेटी
ग्यानूबा तुकाराम त्येच्या चरनी घाली मिठी '
पर तरीबी तुकारामाच्या खाक्या येगळाच ! जिजाबाईचं आनिक त्येचं मजी हें भांडान जबातबा ! "

" म्हणजे देवमाणसंहि भांडतात ? "

" कां न्हाई भांडायची ! देव झाला तरी मानूसच कीं ! अगूदरी तुका दिकून सादाच मानूस हुता. पर—
'वाजंत्री वाजवीतो देहू गांवाचा दरडी
तुका गेला वैकुंठासी वही निगाली कोरडी '
तवा कुठं त्येला देवपन आलं ! "

तुकारामाला देवपण प्राप्त झाल्याची ही हकीकत ऐकून माझ्या मनांत विचार आला, " विठोबाची मनापासून भक्ति करणाऱ्या तुकारामाला नेहमीं वाटायचें कीं,

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।
चालवीसी हातीं धरुनिया ॥

तें अगदीं खरें आहे तर ! रात्रंदिवस विठोबाचा धावा करणाऱ्या जनाबाईला 'देव खातें देव पितें...' असें वाटूं लागून ती स्वतःच देवांत विलीन झाली तसेंच तुकारामाचेंहि झालें. घरच्या संसाराची पर्वा न बाळगतां विठोबाच्या भक्तींत तल्लीन झालेल्या तुकारामानें म्हटलें आहे—

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ।
कर कटावरी ठेवूनियां ॥

तुळसीहार गळां कासे पितांबर ।
आवडे निरंतर तेंचि रूप ॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं ।
कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख ।
पाहीन श्रीमुख आवडीनें ॥

आणि तसें म्हणतां म्हणतां तोच आतां त्या देवपणांत विलीन होऊन गेला आहे ! "

" आजीबाई, तुकारामाची आणखी कांहीं ओळख सांगतां ? " मीं त्या बाईला मोठ्या उत्साहानें प्रश्न केला तेव्हां ती चालतां चालतां थांबून अवखळ पोराला एखाद्या आईनें समजावून सांगावें तशी म्हणाली, " लई नसली तरी थेडी हाय. सांगतें ऐक—

' देहूच्या माळावरी — ईना वाजतो मंजूळ
गांव लोहुगांव — तुकारामाचं आजूळ
इंद्रावनी तुजं पानी — येलवाडी तुजं गहूं
देवा तुकारामा — सादुसंताला घाली जेवूं
येलवाडी तुजं गहू — इंद्रावनी तुजं पानी
देव तुकाराम करी — सादुसंताला मेजवानी
आळंदीची ग वाट — गेली देहूला वाकडी
इंद्रावनीच्या काठायाला — तुका बांधितो झोपडी
हातांत ग टाळवीना — तुका फिरतो घरोघरीं
आनिक मागे तूं मंजूबाई — चला म्हणीतो बरोबरी '

आणि तिनें मला आपल्याबरोबर ओढीतच भरभर चालायला लावली. मला गंमत वाटली. तुकारामाची गोष्ट सांगतांना तिनें जणुं तुकारामाच्या हांकेसरशी पुढें व्हायला पाहिजे असाच इषारा दिला मला ! आणि मीहि मग त्याच आनंदानें पुढचें पाऊल टाकूं लागलें...

आळंदी आतां अगदीं जवळ येऊन ठेपली होती. त्यामुळें तिथल्या राऊळांत बसून ज्ञानदेवाला शोधून काढायला, तिथल्या समाधीजवळ उभें राहून तो कदाचित् आपल्या असंख्य भक्तांना भेट द्यायला वर येऊं शकेल का हें पहायला मी विलक्षण उतावीळ झालें. समोर दिसणाऱ्या आळंदीला डोळ्यांत सांठवून घेत मीं त्या आजीबाईला म्हटलें, " ती दिसते आहे तीच ना आळंदी ? "

त्यावर तोंडावर फार ऊन आल्यावर आपण हाताचा पंजा डोळ्यावर धरतो तसा धरीत ती म्हणाली, " अंग तीच !

' आळंदी वसविली — पांडुरंगा मायबापा
कुंडलिकाच्या देवळाला — इंद्रायनी देती थापा '

ती बग तीच तीच कीं ! " आणि तिनें तिथून हात जोडून मोठ्या भक्तिभावानें नमस्कार केला. त्यावेळीं माझेंहि हात नकळत जोडले गेले आणि मी मनांत म्हणालें, " ज्ञानदेवा, केवढी अगाध लीला केली आहेस तूं ? " एवढ्यांत कांहींतरी दूरवरचें मला दाखवीत ती म्हातारी पुटपुटली,

" नदीच्या पल्याड ग — एक गुतली म्हातारी
गेनूबा माजा देव — अंग झाला उतारी

अशी करामतवी करतूया ग्यानूबा कवा कवा ! जंग जंग आजारानं पछाडलं तरी ग्यानूबाची समाधीव डोस्कं ठेवलं कीं उतार पडतूयाच ! ... "

" अस्सं !...आळंदीला गेल्यावर तुम्ही मला देहूची वाट दाखवाल, आजी ? " — तुकारामाचेंहि दर्शन घ्यावें अशी तीव्र इच्छा मनांत निर्माण झाली म्हणून मीं पाय उंचावून आळंदीचें दर्शन घेत त्या बाईला विचारलें. एवढ्यांत डाव्या बाजूला जाणारा एक रस्ता पुढयांत आल्यामुळें तिकडे बोट करीत ती म्हणाली, " ही बग आळंदी पसन् देहूला जायाची वाट ! बग बग ! ...बाकी तुकारामाची सर कुनाला याची न्हाई बग ! "

" ती कशी काय ? "

" तसंच हाय ! "

" तरी पण ! सांगाना ! ऐकूं दे मला. "

" सांगू म्हनतीस ? खरंच ? "

" हो. तुकारामाशपथ ! "

" अव्वानू ! देवाची आन घातलीस ? खुळी का काय ? " माझ्या तोंडून सहजगत्या तुकारामाचें नांव बाहेर पडलें खरें पण त्यामुळें त्या म्हातारीनें देहूच्या वाटेकडे तोंड करून साष्टांग नमस्कार घालीत तुकारामाची जणुं क्षमा मागितली ! त्यामुळें मी इतकी गोंधळून गेलें कीं, काय बोलावें हेंच मला सुचेना. पण मला फार वेळ त्या अस्वस्थतेंत न ठेवतां तीच सांगूं लागली—

" जिजाबाई बोल — येड लागलं तुकाला
आपुन जातो वैकुंठाला संग म्हनीतो 'चला चला'

पन त्येची जिजाई मोठी जहांबाज बायकू ! तिन शाप सांगून टाकलं,

' तुकाराम बोल — जिजा इमानी चल बैस
येड लागलं तुका तुमा — घरीं दुधाची माजी म्हैस








| | |
|---|---|
| तुकाराम बोल | जिजा इमान आलं न्ह्याया |
| येड लागलं तुमा तुका | घरीं लाडक्या माज्या गाया |
| तुकाराम बोल | जिजा लाव ग उभ कुंकू |
| मी जातों वैकुंठा | मग कळल सर्व सुकू |
| तुकाराम बोल | जिजा संगती माज्या चल |
| माग राहिल्यानी | फार होल्याली तुज हाल ' |

पन भादुरनीनं न्हाई ऐकलं. अखेर शेवटीं तुकारामानंच इच्यार केला—

| | |
|---|---|
| 'कुंकाचा करंड | तुका ठेवीतो इन्यांत |
| सरगी जायाचं | नव्हतं जिजाच्या मनांत ' |

आन् त्यो एकला गेला वैकुंठाला ! डोळ्यादेकत हां हां म्हनीस्तोवर तुका गडप झाल्याला बगून सारी दुनिया ' आ ' वासून बगत राहिली...... सगळीकडं नुसता हैदोस उडून गेला...... पर कुनाची छाती झाली न्हाई तुकारामाला आडवं जायाची !

| | |
|---|---|
| 'तुका गेला वैकुंठासी | कुनी कुनी पाहिला |
| नांद्रुकी झाडाखालीं | जोडा रेशमी राहिला |
| देहूच्या माळावरी | धूर कशाचा ग झाला |
| तुका गेला वैकुंठासी | जिजा सईपाक केला |
| देहूच्या माळावरी | उधळती बुक्का जाई |
| गईप झाला तुका | जिजा भवताली पाही |
| देहूचा मंडप | दुरून दिसतो काळाकाळा |
| तुका गेला वैकुंठासी | वर उपवल्या माळा |
| इंद्रावनीच्या काठायाला | बाई हत्तीच्या दिल्या पागा |
| साधुसंत म्हनीत्याती | तुका वैकुंठी गेला बगा ' |

अशी हाय तुकारामाची गोष्ट ! आनीक मस्त सांगीन पर आतां येळ झाला. सारं गांव म्होरं लोटलं न् तूं निमी हितं उभ्या ! हासल्याली लोक, चल बिगीनं ! न्हाईतर बारीला बसाय लागलं मजी रात उजाडल माजा ग्यानूबा भेटायला ! आत्ता येळ न्हाई न्हाईतर गेनूबाची आन् तुकाची वळक अश्शी केली असती की—

| | |
|---|---|
| ' गान्यामंदी गान | गाता करीन चवडी |
| एकाच गान्यामंदी | तुजी करीन रेवडी ' |

वर आतां चल हुलं !..." आणि मग मागेंहि वळून न पाहतां ती झपाझप चालू लागली...

या अडाणी बायकांनीं अशा रीतीनें मला भेटवलेले ज्ञानदेव आणि तुकाराम मी मनांत सांठवून घेत पुढें त्यांच्या मागोमाग निघालें खरी. पण माझें सारें लक्ष या नव्या ओळखींत गुंगून गेलें होतें. कसल्याहि प्रकारचा अभ्यास न केलेल्या या भोळ्याभाबड्या मराठी मनानें मला भेटवलेले हे दोन महान् संत आणि त्यांची त्यांनीं या विलोभनीय पद्धतीनें केलेली ओळख एवढी नावीन्यपूर्ण वाटली की, मी त्याच जागेवर उभी राहून दोन्ही हात जोडून त्या वारकरणींना व ज्ञानदेवाला नम्रतापूर्वक वंदन करीत ज्ञानदेवाच्याच शब्दांत गुणगुणूं लागलें—

" म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां कें लाहे । उणें जगीं ॥ "

( अ. १८. १७७३ )

---

ज्यांना लोकसंग्रह करण्याची हौस वाटते त्यांना योग्यता नसते. आणि ज्यांना योग्यता असते त्यांना हौस वाटत नाहीं. लोकसंग्रहाला ह्या पेचांतून देवानेंच सोडवावें. —विनोबा, 'विचारपोथी' १३८.

टेकडीसारखा उंच होण्याची मला मौज वाटत नाहीं. माझी माती आसपासच्या जमिनीवर पसरली जावी यांत मला आनंद आहे.

—विनोबा, 'विचारपोथी' १५६.

दु:खें सहन करणें हा तितिक्षेचा आरंभ आहे. तितिक्षेची कसोटी सुखें सहन करण्यांत आहे.

—विनोबा, 'विचारपोथी' २९९.

पहिली ठिणगी पडण्याला युगें गेलीं, पण आतां राख होण्याला त्रैराशिक मांडण्याची जरूर नाहीं.

—विनोबा, 'विचारपोथी' ११३.

संत गाईसारखे वत्सल आहेत. म्हणून स्वतः तत्त्वज्ञानाचा कडबा पचवून जगाला भक्तिनीतीचें दूध पाजीत असतात.

—विनोबा, 'विचारपोथी' ६९६.








देवक– ( Totem ) – संबंधीच्या कोरकु लोकांच्या कथा : श्री. दुर्गा भागवत

# देवककथा आणि सामाजिक आचार-विचार

जेव्हां जेव्हां धर्म व लोकसाहित्य यांचा परस्पर संबंधाचा विचार पुढें येतो, तेव्हां धर्मकथांचा म्हणजेच साध्या शब्दांत सांगायचें झाल्यास , कहाण्यांचाच प्रश्न आपल्या डोळ्यापुढें उभा राहतो. किंबहुना धर्म म्हणजेच कहाणी असेंहि एक चुकीचें कां होईना पण समीकरण आपल्या मनांत घर करून राहिल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. धर्माची स्थूल व्याख्या ‘ ज्याच्यामुळें धारण होतें तो ’ किंवा ‘ चोदना हेंच ज्याचें लक्षण असा ’ अशी वैदिक प्रथेला अनुसरून आपण गृहीत धरली तर, त्यांत क्रियेला व क्रियाहेतूला महत्त्व असतें हें उघड आहे. क्रिया व क्रियाहेतु विधींत साकार होतात. अर्थात् धर्माचें क्रियामय स्वरूप विधीच होय असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं.

## देवकवादा(Totemism)वरील संशोधन

विधि व कहाणी म्हणजे धर्मकथा यांचा परस्परसंबंध काय याचा विचार या लेखांत विषयांतराच्या भीतीनें केला नसला, तरी विधि म्हणजे मूळ आधार व कथा म्हणजे आधारित असें या संबंधाचें स्वरूप थोडक्यांत आहे असें वैदिक वाङ्मयांतल्या विधि व अर्थवादांच्या उदाहरणांवरून आणि यज्ञयागांत सूतपरंपरेनें टिकवून धरलेल्या पौराणिक कथांच्या स्थानावरून दिसून येतें. इतिहास-पुराणांची स्वतंत्र परंपरा वाढत गेली तसतसा तिचा विधीशीं असलेला संबंध शिथिल होत गेला, एवढेंच नव्हे तर तुटलाहि. त्यामुळें वेगवेगळ्या तऱ्हेच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानांशीं कथांची सांगड पडून महाभारतासारखे प्रगल्भ कथाकोश निर्माण झाले. विधि व कथा यांत विधीपेक्षां कथेचें स्थान मुळांतच दुय्यम दर्जाचें होतें, हा मुद्दा मात्र लक्षांत ठेवण्याजोगा आहे. परंतु प्रत्यक्ष विधीपासून ताटातूट झाली, तरी देखील जगभरच्या कथांत उत्पत्तिकथा, देवतांच्या, धर्मगुरूंच्या देवतुल्य वीरांच्या कथा यांना धर्माच्या क्षेत्रांतच अखंड राबविण्यांत आलेलें आहे. अशा या कथांत देवककथांचा समावेश होतो.

लग्नकार्यांत आपण देवक बसवतों. पण देवकाची प्राथमिक कल्पना पांढरपेशा समाजांत समूळ उच्छेद पावली आहे. मूळच्या देवकाचें रूपांतर देवी, गणपति वगैरे कुलदेवतांच्या पूजेंत झालें आहे. पण कुणबी लोकांत मूळ झाड, पशू इत्यादि देवकांच्या नांवाची स्मृति थोडी तरी कायम आहे. देवकांच्या कल्पना व प्रथा जगभरच्या वन्य जमातींत मात्र बऱ्याच ठिकाणीं जागृत आढळून येतात. गेल्या शंभर वर्षांत पाश्चात्त्य मानववंशशास्त्राच्या अभ्यासकांनीं देवकवाद किंवा टोटेमिझमवर बरेंच संशोधन केलेलें आहे. भारतांत डॉ. एलविन यांनीं देवककथांचें छोटें संकलन मध्यप्रांत व मध्यभारतांतील कहाण्या याविषयींच्या आपल्या दोन ग्रंथांत दिलें आहे. पण त्यांतील विवेचन मात्र अगदीं त्रुटित आहे. मुळांत धर्मविधींशीं किंवा कुळाचारांशीं अत्यंत निगडित असलेल्या देवककथांचें आजचें स्वरूप काय आहे, तें या लेखांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

## प्राणिरूप किंवा वनस्पतिरूप देवक

वन्य जातींच्या संस्कारांत देवकाच्या कल्पनेला किती प्राधान्य आहे तें सांगायला नकोच. प्रत्येक घराण्याचें देवक प्राणिरूप किंवा वनस्पतिरूप हें ठरलेलेंच असतें. देवकाची ही प्रथा जितकी प्राचीन आहे तितकी दुसरी कोणतीहि प्रथा नसेल. देवकाच्या कथा या अर्थातच अत्यंत पुरातन कथा आहेत. इतक्या पुरातन आणि केवल कुटुंबनिष्ठ कथा जातिनिष्ठ कथांहूनहि परंपरेंत टिकून राहाणें किती दुरापास्त आहे, हें कल्पनेनेंच जाणलेलें






अनुक्रमणिका



बरें. वन्य जमातींत प्रत्येक कुळाचें देवक त्यांना माहीत असतें, देवकाबरोबर येणारे खाण्या-पिण्याचे नेमनियम, पूजाअर्चा वगैरे हीं अगदीं कसोशीनें नसलीं तरी अजूनहि स्थूलार्थानें मध्यप्रांतांत पाळलीं जातात. पण जातीच्या उत्पत्तीच्या वगैरे कथा जशा त्या त्या जातींत किंवा जातिसमूहांत प्रत्येकाला स्थूलपणानें का होईना माहीत असतात तसें देवकांविषयींच्या कथांचें होत नाहीं. मला त्या कथांचे फुटकेतुटके अवशेष केवळ कोरकु लोकांत होशंगाबाद व बैतुल जिल्ह्याच्या सीमेवरतीं मिळाले. या कथा अत्यंत विशीर्ण स्वरूपांत आहेत. कारण उघड्च आहे. ज्या देवकावर त्यांचें अस्तित्व अवलंबून आहे, त्या देवकाच्या विषयीं वर सांगितलेले कांहीं ढोबळ आचार सोडले, तर इतर माहितीहि नष्ट झालेली आढळून येते. केवळ कुटुंबनिष्ठ आचारांच्या व इतिहासाच्या परंपरेची स्मृति दीर्घकाल, ते आचार शिथिल झाल्यावर, लोकांच्या स्मरणांत रहात नाहीं, याचें देवककथा हें उत्तम उदाहरण आहे. देवककथांमध्यें एकाद्या देवकानें एकादा आचार न पाळल्याबद्दल किंवा पुढें येणारें संकट टाळण्याकरतां भयसूचक इषारा एकाद्याला स्वप्नांत येऊन दिला आहे, किंवा अन्य कोणत्याहि तऱ्हेनें संकटकालीं माणसाला दिलासा दिला आहे, अशा तऱ्हेच्या कथा अपेक्षित असूनहि त्या अजिबात लुप्त झालेल्या आहेत. पुरातन काळीं, जेव्हां वन्य अवस्थेशिवाय दुसरी अवस्थाच या जातींना माहीत नव्हती, केवळ शिकार व कंदमुळांचें भक्षण हेंच त्यांच्या उपजीविकेचें साधन होतें, शेतीची विद्या त्यांना ऐकूनहि माहीत नव्हती, तेव्हां भक्तांशीं जें कुलदेवतांचें नातें तेंच वन्य कुटुंबांशीं देवकाचें नातें असलें पाहिजे. त्यावेळीं अशा साक्षात्काराच्या कथा हव्या तेवढ्या मुबलक असल्या पाहिजेत. कारण आजहि " अमुक एक देव किंवा ग्रामदेव आपल्या स्वप्नांत आला आणि त्यानें आपल्याला अमुक अमुक सांगितलें, किंवा अमुक एक प्राणी स्वप्नांत दिसला, त्या स्वप्नाचें फळ असें " अशा तऱ्हेच्या गप्पा आदिवासींमध्यें आपणांस प्रत्यहीं आढळून येतील. पण या अनुभवांचा व त्यावरील ठोकताळ्यांचा देवकाशीं असलेला संबंध आतां तुटला आहे.

ज्या कोरकु कथा मला मिळाल्या आहेत त्याहि दुर्बोध आहेत. कांहीं कांहीं अगदी उताऱ्यासारख्या त्रोटक आहेत. कांहीं अपस्मृतींनीं पोखरलेल्या आहेत. कांहीं एकदोन ओळींत मावणाऱ्या प्रसंगाची दखल घेणाऱ्या आहेत. ज्यांच्याकडून मला या कथा मिळाल्या त्यांनीं ' ठराविक दिवशीं देवकाच्या नांवानें पूजन करण्याच्या प्रथेशिवाय अन्य कुठलीहि प्रथा किंवा कल्पना देवकाबद्दल अस्तित्वांत नाहीं ' असें सांगितलें.

## कोरकूंच्या देवककथा

**कसदा**– ( म्हणजे दरड ) आणि **सागोन** ( सागवान ) या दोन पुरातन गोत्रांपासून साऱ्या कोरकूंची उत्पत्ति झाली. त्या विषयीं अशी कथा आहे कीं, पुरातन काळीं एक मुलगा व त्याची बहीण अशीं दोघेंच राहात होतीं. त्यांचें गोत्र एकच असल्यानें त्यांना लग्न करणें शक्य नव्हतें. तेव्हां भगवानाला चिंता पडली, कीं कुळक्षय होतो कीं काय ? त्यानें तो टाळण्यासाठीं चवताळलेल्या भयंकर वाघाचें रूप घेतलें आणि त्यांना भेडसावलें. तीं दोघें जीव घेऊन पळूं लागलीं. मुलगा सागाच्या झाडावर चढला. मुलगी एका दरडींत लपली. वाघ गेल्यावर कांहीं तासांनीं तीं दोघें बाहेर आलीं. परंतु भीतीनें त्यांना आपल्या पहिल्या नात्याचें विस्मरण पडलें; इतकें कीं त्यांनीं एकमेकांना ओळखलेंहि नाहीं. नव्यानेंच ओळख झाल्यासारखीं तीं वागूं लागलीं. एकमेकांवर अनुरक्त झालीं आणि त्यांनीं लग्न लावलें. त्या वेळेपासून मुलीचें गोत्र कसदा व मुलाचें सागोन असें झालें. दरड व सागवान हींच त्यांचीं देवकें बनलीं.










भाऊबहिणींपासून जातीची उत्पत्ति व्हायची हा संकेत आदिवासींच्या उत्पत्तिकथांत प्रामुख्यानें आढळतो. भगवानानें एक स्त्री व पुरुष निर्माण करायचा; तीं बहीणभावंडें असायचीं आणि भगवानाच्या प्रेरणेनेंच लैंगिक व्यवहाराचें ज्ञान मिळून त्यांनीं पतिपत्नी व्हायचें व प्रजोत्पत्ति करायची या प्रकारची कथा गोंड, बैगा, भिल्ल, उरावण वगैरे जातींत मिळाली नाहीं असें व्हायचेंच नाहीं. वैदिक प्रथेंतहि त्र्यंबक व अंबिका, यज्ञ व दक्षिणा यांच्यांत हेंच नातें होतें. यम व यमी यांनीं यमाच्या हेक्यामुळें ही प्रथा तोडली. त्यानंतर भाऊबहीणीचा संबंध लैंगिक व्यवहारास निषिद्ध मानला गेला. गौतमबुद्धानेंहि अंबष्ठसुत्तांत ‘क्षत्रिय पुष्कळदां स्वतःच्या रक्ताचें शुद्धत्व राहाण्यासाठीं, इतर कुळांशीं संबंध जोडण्यापेक्षां, स्वकुळांतील भाऊबहिणींचींच लग्नें लावतात,’ असें अभिमानानें सांगितलें आहे. पण हा अर्थात् परंपरेनें पराक्रमी महाभागांच्या बाबतींत केलेला अपवादच समजला पाहिजे. राम-सीता एकमेकांचीं बहिणभांवडें असण्याचा जातकांतील विवाद्य मुद्दा अशा तऱ्हेनें पाहिलें कीं उलगडतो.

वरच्या कथेंत गोत्र व देवक यांची चमत्कारिक सांगड पडली आहे. गोत्र व देवक यांत जो भेद असायला पाहिजे, तोहि नष्ट झाला आहे. याचें उदाहरण पुढील बेठे गोत्राच्या कथेंत अधिक चांगलें दिसून येतें. ती अशीः

एकदां एक हरिणी रानांतून वेगानें पळत असतां शिवणीच्या झाडाचें फळ खालीं पडलें आणि त्याचा फटका पायावर बसून हरिणी जायबंद झाली. तिला उभें राहावेना. ती मटकन् त्या झाडाखालीं बसली. त्या झाडावर एक माणूस बसला होता. हरिणी उठून जाईपर्यंत तो झाडावरच बसून राहिला. हरिणी गेल्यावर तो गांवांत परतला. गांवच्या देवऋषीनें त्याला विचारलें ‘तुला यायला वेळ कां झाला ?’ तेव्हां आपण रानांत हरणामुळें कसे अडकून पडलों तें त्यानें सांगितलें. “तूं इतका वेळ बसलास त्या अर्थीं तुला बेठे (बसलेला) म्हणतील.’ तेंच त्याचें गोत्र झालें.

या गोष्टींत निरुपद्रवी हरिण खालीं बसलें असतां तो माणूस उतरला नाहीं, त्या अर्थीं कदाचित् हरिण त्याचें देवक असावें. देवक म्हणजे मूळ उत्पत्तिकारण. तेव्हां त्याच्या अंगावर पाय देणें, तें समोर असता निघून जाणें, त्याला मागें टाकून निघून जाणें, हेंहि धर्मनिषिद्ध समजलें जात असें. मग त्याला स्पर्श करणें, त्याच्याबरोबर सलगी करणें, किंवा त्याचें मांस खाणें, त्याचें कातडें, शिंगें वापरणें तर दूरच ! परंतु कथेंत हा भाग लुप्त झालेला दिसतो आणि त्या देवकाच्या स्मृती कुळांतूनहि नांवाखेरीज लोपल्या असल्यामुळें कुटुंबधर्माचें परिवर्तन ग्रामधर्मांत किंवा जातिधर्मांत झालें असें दाखविलें आहे.

**डीकर** नांवाच्या गोत्राची कथाहि अशीच उद्बोधक आहे. ( डीकर म्हणजे गोड्या पाण्यांतल्या एका अगदीं लहान माशाचें नांव आहे. ) एक माणूस नदीवर मासे पकडण्यासाठीं गेला होता; त्यावेळीं त्याला एक मोठा मासा नदीच्या कपारींत बसलेला आढळला. त्या मोठ्या माशाला भिऊन तो माणूस एका खडकामागें लपून बसला. दुसऱ्या एका माणसानें तें पाहिलें. तेव्हांपासून त्यानें त्याला ‘डीकर’ म्हटलें. तेंच त्याचें नांव कायम झालें. ‘डीकर’ हें नांव अर्थात् मूळच्या देवकाचें नसून, लहान मासा मोठ्या माशाला भितो तसा हा माणूस आणि तोहि मासे पकडण्यास गेलेला भ्यालेला पाहून हें नांव त्याला चेष्टेनें दिलें गेलें, हें उघड आहे. परंतु प्रथा व कथा यांतलें अंतर, डीकर लोक लहान मासे खात नाहींत ही प्रथा लक्षांत घेतली, तर चांगलें दिसून येतें. कोरकूंमध्यें त्या प्राण्याच्या नांवचें गोत्र व देवक असणें आणि त्याचें









अनुक्रमणिका

मांस न खाणें या बाबतींतलें इतकें स्पष्ट उदाहरण मला दुसरें आढळलें नाहीं. या कथेंतील विसंगति अशी कीं डीकर मासे न खाण्याची प्रथा त्या कुटुंबांत पुरातन असावी आणि वरचा प्रसंग चेष्टेचा असल्यानें तो मात्र स्मरणांत राहिला असावा. गोंड लोक देवकांच्या बाबतींत जितके कांटेकोरपणें खाणेंपिणें पाळतात तसे कोरकु पाळींत नाहींत असें त्या जातींच्या खाण्यापिण्यांतल्या नेमानियमांची चौकशी करतांना मला आढळून आलें.

**बासुम** ( बासुम म्हणजे उष्टी पत्रावळ ) गोत्राची कथा अशी आहे: एकदां एक मूल अंगणांत खेळत होतें. कसला तरी आवाज झाला आणि तें भ्यालें. कुणी तरी उष्टी पत्रावळ निष्काळजीपणें भिरकावली होती. ती त्या पोराच्या थोबाडावर बसली होती. त्या मुलाच्या गोत्राचें नांव त्यानंतर बासुम असेंच पडलें. या कथेंत देवकाचा संबंध अजिबात तुटलेला आहे.

**मोरी** गोत्राची कथा अशी: ( मोरी म्हणजे खळगा ). एक माणूस रानांत ' दर्दी ' नांवाच्या मुळया खणीत होता. इतक्यांत कसल्या तरी भयानें तो त्या खळग्यांतच लपला. तेव्हां पासून त्याला 'मोरी' हें नांव मिळालें. या कथेंत 'दर्दी' खोदतांना तो कां भ्याला याचें कारण दिलें नसलें तरी कदाचित् दर्दी हेंच त्याचें देवक असावें व त्याला खणलें म्हणून त्या देवकानें त्याला भिवविलें असावें असा अंदाज होतो.

एक मुलगा एकदां घाबरला व जांबाच्या झाडावर बसला. तेव्हां पासून त्याला **जांबु** हें नांव पडलें.

एक माणूस घाबरून डोंगराच्या पठारावर जाऊन बसला. त्यावरून **आखंडी** ( डोंगरांचें पठार ) हें नांव त्याला मिळालें.

एकदां कांहीं मुलें खेळत असतां एक मूल कोंबडीच्या खुराड्यांत लपलें. पुढें त्याला **अकटोम** ( कोंबडीचें खुराडें ) हेंच नांव मिळालें.

कांहीं मुलें लपंडाव खेळत असतांना एक मुलगा नदीच्या वाळूंत लपला. तेव्हां पासून **सबंकर** ( वाळू ) हेंच नांव त्याला मिळालें.

एक मुलगा अंबाडीच्या झाडामागें खेळत होता, म्हणून त्याला **सन** (अंबाडी) हें नांव पडलें.

एक मुलगा रानांत एकटाच खेळत होता म्हणून **बन** ( रान ) हें नांव त्याला पडलें.

एकदां एका मुलानें तारा तुटतांना पाहिला आणि तो घाबरला. **चामिल** ( उल्का ) हेंच नांव त्याला पडलें.

खेळतां खेळतां एक मुलगा मक्याच्या पिकांत लपला. म्हणून **तोटा** (मका) हेंच नांव त्याला पडलें.

एक मुलगा खेळतांना काकडीच्या वेलामागें लपला. तेव्हां पासून **टाखर** ( कांकडी ) हेंच नांव त्याला पडलें.

### भय आणि खेळ याभोंवतीं गुंफण

जांब, सन, तोटा, टाखर वगैरे नांवें झाडांचीं आहेत. अर्थात तीं देवकांचींच नांवें असलीं पाहिजेत यांत शंका नाहीं. पण देवकाची प्रथा लुप्त झाली व त्याच्या प्रथेचा एक अंश गोत्रकथांत मिसळून गेला. गोत्राचें व देवकाचें एकीकरण झालें.

या सर्व गोष्टींत भय वाटणें व खेळणें या दोन बीजाभोंवतींच कथांची गुंफण झाली आहे. भयाचा उलगडा देवकाच्या प्रथेवरून होतो. पण खेळण्याच्या बीजाचा विस्तार कथांत मुळींच झाला नसल्यानें त्याची उपपत्ति लावतां येत नाहीं.

या साऱ्या गोष्टी अत्यंत नीरस, एकाच ठशाच्या आणि संपूर्ण मोडकळलेल्या स्थितींत आहेत. त्यामुळें जुन्या विस्मृत कथांचा, स्मृति व अपस्मृति यां दोहोंनीं कायम ठेवलेला मूळच्या कथेचा एक अंशच या गोष्टींत सांपडतो असें अनुमान होतें. सामाजिक किंवा जातीय धार्मिक रूढींचें मूळ जे कुळाचार, त्यांना अनुलक्षून बनलेल्या कुळकथांची किंवा पर्यायानें प्राचीनतम अशा देवककथांची स्थिति ही अशी आहे.





अनुक्रमणिका

श्री. त्रिंबक गोपाळ देशमुख

# गांधीजी व पत्रविज्ञान (Journalism)

" धर्मोपदेशक, वैद्य अथवा असल्या इतर व्यवसायी मंडळींच्या गुणोपाधीबद्दल किंवा पात्रते-विषयीं थोडी तरी निश्चितता व स्थिरता आहे. पण पत्रविज्ञानाचा व्यवसाय मात्र अनिश्चित व अस्थिर राहिला आहे. धड त्याला अढळ अशा पात्रतेचें बंधन राहिलें नाहीं वा एखाद्या गुणोपाधीचा टिळाहि लागला नाहीं." असे उद्गार एन्. डब्ल्यु. कनलिफ् यांनीं १९३७ च्या ब्रिटानिकाच्या ज्ञानकोशांत काढले आहेत.

पत्रविज्ञानाच्या या धरसोडीच्या पेशाला महात्मा गांधींनीं आपल्या व्यक्तिमत्त्वानुसार वळण लावलें. हें वळण वहिवाटीपेक्षां अगदींच आगळें होतें. सैरावैरा संचार करणाऱ्या पोरास आपल्या कडक शिस्तीखालीं वळणावर आणावें तसें गांधीजींनीं आपल्या क्षेत्रांत पत्रविज्ञानास बंधन घालून त्यास वळणावर आणलें; पण शिस्तीच्या बंधनाचे जे स्वाभाविक दोष ते त्या पत्रविज्ञानांत स्वाभाविकपणेंच राहिले. गांधीजींचा पार्थिव देह नाहिसा होतांच हे दोष उफाळून वर आले. आणि गांधीजींनीं ठेवलेले पत्रविज्ञानाचे आदर्श, त्यांतील नीतितत्त्वाचा कित्ता हा तेवढा शिल्लक राहिला. त्यांचें वृत्तपत्र पूर्ववत् जीवन जगण्यास अपात्र ठरलें. कदाचित् त्यांनीं काढलेल्या वृत्तपत्राचा कार्यभाग त्यांच्या हयाती-पुरताच मर्यादित असेल, तेवढ्यांतच त्याची पूर्तता असेल.

पत्रविज्ञानक्षेत्रांत गांधीजींनीं जे मानदंड घातले आहेत त्यांचें दिग्दर्शन करण्यापूर्वी त्याच्या मागची पूर्वपीठिका पहाणें उद्बोधक होईल.

**' जीवनाचे आरसे '**

गांधीजींना खिस्ताचे अवतार मानतात, असें रोमेन रोलान्ड यांनीं म्हटलें आहे. हा ख्राइस्ट आतां नवीन युगांत अवतरला होता. त्या नव-युगाचें लोकप्रचाराचें प्रमुख साधन वृत्तपत्रें असल्या-मुळें गांधीजींच्या तत्त्वप्रचाराचें पत्रविज्ञान हें साहजिकच उपकरण बनलें.

हा नवीन ख्राइस्ट राजकारणाच्या आखाड्यांत उतरून त्यांतहि पटाईत ठरला. आजच्या काळांत राजकारण किंवा समाजकारण यांविषयींच्या विचारांचें प्रतिबिंब बव्हंशीं वृत्तपत्रांतून पडलेलें असतें. याच अर्थानें आपल्या वृत्तपत्रांस " माझ्या जीवनाचे ते आरसे आहेत " असें जें गांधीजींनीं संबोधिलें आहे, त्यांत पत्रविज्ञानाविषयीं त्यांची श्रद्धा स्पष्टपणें उमटलेली दिसून येते.

गांधीजी पत्रज्ञ ( Journalist ) झाले हाहि एक दैवयोग किंवा योगायोगच होय. दक्षिण आफ्रिकेच्या चळवळींत वर्तमानपत्राची त्यांना आवश्यकता भासली. उत्साहशक्ति व निश्चयाचें बळ त्यांच्याजवळ अमाप होतें. वृत्तपत्राच्या कार्याला हात घालतांच त्यांनीं त्यांत आपला सर्व जिव्हाळा ओतून लिखाण केलें. साधनाची शुद्धता पाळण्याची या क्षेत्रांतहि त्यांनी कसोशी केली. 'इंडियन ओपीनियन' हें साप्ताहिक गांधीजींचें पत्रविज्ञानांतील पहिलें पाऊल होय. हें पत्र त्यांच्या आफ्रिकेंतील चळवळीचें प्रमुख अंग होतें. " आफ्रिकेंतील चळवळीचा प्रचार व वाढ ह्या पत्राविना एवढीं यशस्वी रीतीनें झालीं नसतीं " असे त्यांनीं उद्गार काढले






अनुक्रमणिका





आहेत. याच पत्रामुळें त्यांच्या विचाराचें लोण जगांत फार लांबवर पोचलें. 'इंडियन ओपीनियन'च्या वाचनामुळें रशियांत टॉलस्टॉयचें गांधींजींविषयींचें कुतूहल व आस्था वृद्धिंगत झालीं. याबाबतींत टॉलस्टॉयनें सप्टेंबर ५, १९१७ रोजीं आपल्या रोजनिशींत तसा उल्लेख केला आहे.

खुद्द गांधींजींनींच त्यावेळची जी स्थिति वर्णिली आहे, त्यामधून त्यांच्या पत्रविज्ञानांतील ध्येयवादाचें दर्शन होतें. त्यांनीं म्हटलें आहे: "याच सुमारास (१९०४) 'इन्डियन ओपीनियनचें' संपादन करण्याची जबाबदारी मी उचलली. हें पत्र दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या कल्याणाचा ऊहापोह करीत असे. पण मला लवकरच असें आढळलें कीं माझ्या आर्थिक साहाय्याशिवाय तें पत्र जगूं शकत नाहीं. तेव्हां माझी बचत मी त्यासाठीं खर्च करूं लागलों व सरतेशेवटीं तर जवळ जवळ माझी सारीच मिळकत त्यांत फस्त होऊं लागली. 'इन्डियन ओपीनियन' हें त्यावेळीं आजच्या 'यंग इंडिया' किंवा 'हरिजन' प्रमाणें माझ्या जीवनाचा आरसाच होतें. अतिशयोक्ति अगर हेवादावा याचा तर त्यांत लवलेशहि नव्हता. खरोखरच हें पत्र म्हणजे आत्मसंयमनाची एक शिकवणच होती आणि या पत्रकांतील भाषापद्धतीनें माझ्या टीकाकारांस आपल्या लिखाणावर लगाम घालावा लागला हें मला माहीत आहे." गांधीजींचें 'इंडियन ओपीनियन' हें पत्र अजूनहि चालू असून तें तीन भाषांतून निघतें. आपला मुलगा मणिलाल यास मुद्दाम या कार्यासाठीं त्यांनीं पाठविलें होतें.

## अक्षर वाङ्‌मय

१९१९ च्या सुमारास 'यंग इंडिया' व 'नवजीवन' हीं दोन पत्रें गांधींनीं काढलीं. पहिलें इंग्रजींत तर दुसरें गुजराथींत होतें. हिंदुस्थानांतील त्या काळच्या आन्दोलनांचीं हीं पत्रें मुखंड ठरलीं. गांधीजींच्या अहिंसातत्त्वाचा व एकंदर त्यांच्या हिंदी राजकारणाचा प्रचार व प्रसार देशांत व देशाबाहेर करण्याचें महान् कार्य या वृत्तपत्रांनीं केलें. ह्या पत्रांच्या साधनानें राजकीय क्षेत्रांत त्यांचें पाऊल पक्कें रोंवण्यास मदत झाली. १९२२ सालीं इतर वृत्तपत्रें निष्प्रभ होत असतां गांधीजींचीं हीं पत्रें हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजावर शुक्राच्या तेजस्वी चांदणीप्रमाणें चमकूं लागलीं.

१९२८ मध्यें 'यंग इन्डियां'तील लेखाबद्दल त्यांना अटक झाली व त्यांना दोषी ठरविण्यांत आलें. 'यंग इन्डियां'त त्यांनीं जे तीन जहाल लेख लिहिले त्यांतील शेवटच्या लेखांतील ओळी अशा होत्या :

"No Empire intoxicated with the red wine of power and plunder of weak races has yet lived long in the world. The fight that was commenced in 1920 is a fight to finish, whether it lasts for a month or one year or many years."

राजकारणाशिवाय इतरहि प्रचारक्षेत्रांत ह्या पत्रांचा गांधीजींनीं उपयोग करून घेतला. गांधीजी हे मोठे पद्धतशीर प्रचारक होते. खादी लोकप्रिय करण्यासाठीं त्यांनीं आपल्या वृत्तपत्राचीं कित्येक पृष्ठें खर्चीं घातलीं. खादीधारी लोकांच्या नांवांच्या याद्या, त्यांनीं काढलेल्या सुताच्या वारांच्या आंकड्यांनिशीं ते प्रसिद्ध करीत. शिवाय वाचकांचा पत्रव्यवहारहि प्रकाशित करीत. दररोज त्यांच्याजवळ पत्रांचा डोंगर जमत असे. त्यांतील प्रकाशित पत्रांची निवड आपल्या तत्त्वप्रचाराला सहायक होईल अशीच ते करीत असत. चरका फिरविणें, खादी वापरणें, ग्रामोद्धार करणें इत्यादि विषयांवरील त्यांच्या लेखांतून मानवी जिव्हाळा ओतप्रोत भरलेला असे. गांधीजी आपल्या हरेक साध्याला देशव्यापी अगर जगद्व्यापी स्वरूप देत. या साध्याच्या विराट् स्वरूपामध्यें गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत व सामान्यांपासून असामान्यांपर्यंत



अनुक्रमणिका






जनतेच्या जीवनाचें सुखस्वप्न त्यांनीं रेखाटलेलें आढळून येई.

गांधीजींनीं देशाची नाडी पारखली होती. त्यामुळें त्यांच्या राजकारणांतील प्रत्येक आव्हानाचा व आवाहनाचा सर्व देशांतून प्रतिध्वनि निनादत असे. त्यांच्या वृत्तपत्रांतील लेखांतून पुष्कळ वेळां हिंदुस्थानच्या आत्म्याचा आविष्कार होत असे. त्यांच्या पत्रांचा खप अशा वेळीं जरी फार प्रमाणावर नसला तरी इतर बहुतेक वर्तमानपत्रें त्यांचे लेख पुनर्मुद्रित करीत. आणि तसें करण्यास गांधीजींचें कसलेंच बंधन नसें.

ब्रिटिश साम्राज्यशाहीनें 'यंग इन्डिया'स चिरडून टाकलें. त्यानंतर १९३३ मध्यें गांधीजी तुरुंगामध्यें असतांना ' हरिजन ' जन्मास आला. 'हरिजना'नें त्यांचा आवाज हिंदुस्थानभर दुमदुमविला. हिंदी समाजांतील नाना दोषांना वाचा फोडून, हिंदी समाजाची अंतःशुद्धि करण्यास व प्रचंड साम्राज्यशाहीला कोलमडून पाडण्यास या पत्राचेंच साहाय्य झालें. ' चले जाव ' चळवळीचें आव्हान ' हरिजना'च्याच ज्वालामुखींतून बाहेर पडलें. ' हरिजनां'तील प्रत्येक शब्द साऱ्या वर्तमानपत्रांतून पुनर्मुद्रित होत असे. या पत्राचा खप इतर पत्रांच्या मानानें सर्वांत ज्यास्त होता. हें पत्र इंग्रजी, हिंदी, उर्दू ( दोन ठिकाणांवरून ), उरिया, मराठी, गुजराथी, तामील, तेलगु ( दोन ठिकाणांवरून ), कानडी इत्यादि भाषांतून प्रसिद्ध होत असें.

गांधीजींच्या हत्येनंतर ' हरिजन ' पत्र पोरकें झालें. वास्तविक तें मरून जायचें पण किशोरलालजी मश्रुवाला यांनीं तें आपल्या अंगावर घेतलें. कांहीं काळ त्यांनीं त्याचा सांभाळ केला. इतरांचाहि त्यास हातभार लागला. त्यानंतर अजूनहि तें चालू आहे. पण गांधीजींमुळें त्या पत्राला आलेलें खास वैशिष्ट्य त्यांच्या मृत्यूनंतर कमी झालें आणि तें स्वाभाविकच होतें. गांधीजींचें हें पत्र ' वृत्तपत्र ' नसून ' मतपत्र ' होतें. मूळ त्या मतपत्राचा आधार जो मतवादी तोच गेला तेव्हां तें पत्र पूर्वींच्याच वैशिष्ट्यानें चालणें शक्यच नव्हतें. 'हरिजना'चा आत्माच महात्मा होता. 'हरिजना चे ते गांधीजींच्या वेळचे अंक आता इतिहासपत्रें झालीं आहेत. त्या इतिहासपत्रांमध्यें गांधीजींच्या जीवनाचें अमूल्य असें विराट् दर्शन आहे, ब्रिटिश साम्राज्याच्या मरणयातनेचे मृत्युलेख आहेत, हिंदच्या गुलामगिरीची शेवटची नोंद आहे, जगाच्या एकपंचमांश लोकांचा इतिहास आहे. वृत्तपत्रांना सहसा न लाभणारें हें भाग्य– अक्षरत्व– अशा मतपत्रांनाच लाभतें. या दृष्टीनें गांधीजींची मतपत्रें ' अक्षर ' वाङ्मय रूपानें अमर राहतील.

वरील पत्रांच्या साहित्यानें गांधीजींनीं अहिंसा व सत्य या तत्त्वप्रणालींच्या सिंचनानें संपूर्ण भारत शुचिर्भूत केला. ॲटम बॉम्ब व सत्तापिपासू ब्रह्मराक्षसांच्या अकाळविकाळ सावल्या या ग्रहगोलावर पडत असतांना महात्माजी एकाकी आपल्या पत्रांतून शांततेची, अहिंसेची तुतारी फुंकीत होते. या विलक्षण घटनेचें आइनस्टीनसारख्या महाशास्त्रज्ञास देखील कुतूहल वाटलें. इंग्लंडमधील मिस मॉड रॉयडन या प्रसिद्ध आंग्लविदुषीनें 'हरिजन'बद्दल खालील अभिप्राय प्रगट केला आहे : " Numbers of 'Harijan' that reach me week by week are like a drink of pure water in hot and thirsty land...... To read the words of Gandhiji in ' Harijan ' is to be lifted above senseless noise and confusion into a purer and clearer air—clearer for it enables us to see above the dust of battle and purer because it is inspired by such utter fidelity to truth. "

### पत्रविज्ञानाचे नवीन मानदण्ड

गांधीजींनीं पत्रविज्ञानाचे जे नवीन मानदंड निर्माण केले ते संक्षिप्तपणें पुढीलप्रमाणें होत :








(१) आजचा पत्रव्यवसाय ज्या एका जाहिरातीच्या रोगानें पछाडला आहे, त्याचा गांधीजींनीं स्वतःला स्पर्शच होऊं दिला नाहीं. 'इन्डियन ओपिनियन' मध्यें पडतीच्या काळांत देखील त्यांनीं जाहिराती स्वीकारल्या नाहींत. स्वतःच्या खिशांतून १२ ते १५ पौंड त्यांना खर्च करावे लागत. त्यांचें नेहमींचें ब्रीदवाक्य असें असे कीं, " जें पत्र जाहिरातीशिवाय जगूं शकत नाहीं तें वाचण्याच्या किंमतीचें नसतें. या बाबतींत त्यांनीं एक जी कसोटी ठरविली होती ती प्यारेलालजींच्या शब्दांत सांगायचें झाल्यास अशी होती— " जर वृत्तपत्राची गरज लोकांना भासेल तर ते आपोआपच जरूर असलेलें आर्थिक साहाय्य करतील. "

जाहिरातींची त्यांनीं पर्वा केली नाहीं. कारण वर्तमानपत्रांतून स्वतःस मिळकत व्हावी ही त्यांना केव्हांच अपेक्षा नव्हती. ज्या कार्यासाठीं त्यांनीं आपलें आयुष्य पणास लावलें त्याच कार्याच्या प्रसाराकरितां आपल्या वृत्तपत्रांचा त्यांनीं सदुपयोग केला.

(२) बनावट बातमी देणें ते पाप समजत. कमी महत्त्वाच्या गौण मुद्द्यावर भर देऊन त्याचा वर्तमानपत्रांत भपका करणें त्यांना मुळींच आवडत नसें. खोट्यानाट्या बातमीची रंगत करून भडक शीर्षकानें वाचकांच्या नजरा आकर्षित करण्याची हातोटी त्यांना अनैतिक वाटे.

(३) हुलकावणी देऊन बातमी ( scoops ) काढण्याचें कसब पत्रविज्ञ-(Journalist)ला कसें शोभतें याचें त्यांना नेहमी नवल वाटे. उलट पक्षीं त्यांना असें प्रामाणिकपणें वाटे कीं जरी एखादी बातमी वृत्तसंस्थेस मिळाली तरी तिनें ती प्रगट न करतां आपल्याजवळच स्थगित करून ठेवावी आणि जबाबदारीनें मुळांत चौकशी करून ती बातमी खरी आहे हें ठरेपर्यंत तिला कसलीहि वाच्यता देऊं नये.

(४) " कोणतेंहि सामाजिक सत्य गांधीजी ( १ ) अवलोकन ( २ ) ज्ञानेंद्रियें व बुद्धिसामर्थ्य यांच्याद्वारें ठरविलेलें प्रमेय ( ३ ) आणि त्याचें त्यांच्या आश्रमांतील प्रात्यक्षिक या शास्त्रीय कसोट्यांवर घासून पुसून घेत. यामुळेंच समाजशास्त्रज्ञ म्हणून त्यांचा लौकिक होता " असें रिचर्ड ग्रेग ह्यांनीं प्रतिपादिलें आहे. पत्रविज्ञानक्षेत्रांतहि गांधीजींनीं वरील शास्त्रीय कसोट्याच उपयोगांत आणल्या व त्यामुळें ते यशस्वी पत्रज्ञ ठरले.

गांधीजींच्या पत्रविज्ञानांतील या कसोट्या व मानदंड आदर्श ('abstract ideals') वाटतात. हे मानदंड त्यांच्या अपवादात्मक व्यक्तिमत्त्वाप्रमाणेंच असामान्य आहेत. पत्रविज्ञानाच्या तात्त्विक उच्चतम आदर्शाशीं त्यांनीं घालून दिलेले मानदंड सुसंवादी असले, तरी जगाच्या वर्तमान परिस्थितींत ते वृत्तपत्रांना पेलण्यासारखे नाहींत. जवळजवळ एक शतकानंतर जन्म पावण्यास योग्य असलेल्या या महामानवानें आपल्या शतकांत जन्म घेतला. त्यामुळें त्याची प्रगल्भता व पुरोगामिता आपल्या चालू काळाच्या आवाक्याबाहेरची भासते.

### पत्रविज्ञानाला दुय्यम स्थान

गांधीजींच्या जीवनांत पत्रविज्ञानास दुय्यम दर्ज्याचें स्थान होतें. आपली नवीन तत्त्वप्रणाली केवळ वर्तमानपत्राच्या लिखाणावर स्थापन करतां येईल, असें त्यांना कधींच वाटत नसे. त्यांच्या धर्माचें नांवच मुळीं कर्मयोग होतें. साधनहि शुद्ध असलें पाहिजे हा त्यांचा सिद्धान्त असल्यामुळें त्यांनीं सत्कार्यास लावलेलें पत्रविज्ञान देखील "पवित्रता क्षमा तेज धैर्य अद्रोह नम्रता " ह्या गुणांनीं सहजच उजळून गेलें.

गांधीजींचा मूळ पिंड हा आचरण करणाऱ्या कर्मयोग्याचा होता. त्यांतच त्यांचा खरा जीव होता. नोआखली हत्याकाण्डाच्या वेळीं वृत्तपत्रांतून भावनामय वर्णन करण्याच्या ते भरीस पडले नाहींत. उलट, इतर









सर्व कामें बाजूला सारून त्यांनीं नोआखलीच्या कर्मभूमीवर पदार्पण केलें. कर्मांतच त्यांचा खरा राम होता. कर्मभूमींतच ते खरे रंजले व गांजलेहि.

पत्रविज्ञानाचा त्यांनीं धंदा केला नाहीं. कारण ते संत होते. " विश्व हें अवघेंचि घर " अशी त्यांची प्रवृत्ति झाली होती. घरगुती असें त्यांना जीवनच नव्हतें. सेवाग्रामच्या त्यांच्या देवघरास सार्वजनिक देवालयाचें रूप आलें होतें. वाटेल त्या लहान थोर आसामीनें उठावें व त्या देवालयांत जाऊन आपली गाऱ्हाणीं मांडावीं किंवा एखादी चर्चा करावी असा जणूं शिरस्ता पडला होता.

पण हा सर्व व्याप मागें असतांनाहि पत्रविज्ञानी लेखनास हवा असलेला अभ्यास वा वाचन यांत गांधीजींकडून कधींहि कसूर होत नसे. गांधीजी आपल्या संडासास वाचनालय म्हणत. हें निव्वळ नांवापुरतेंच नव्हतें, तर तेथील संडासाच्या बैठकीवर पुस्तकें ठेवण्याची फळी लावलेली होती. सामान्य वाचक जेवढें वाचन आपल्या आयुष्यांत करूं शकेल एवढें वाचन त्यांनीं 'त्या' अभ्यासिकेंत केलें. गडबडीच्या आयुष्यांत त्यांना फक्त तेथेंच शांत क्षण मिळत. आणि ते सारे क्षण आपल्या वाचनासाठीं व मननासाठीं गांधीजी वेंचीत. महत्त्वाच्या पेंचप्रसंगीं मनन करून त्यांनीं आपले निर्णय तेथेंच घेतले आहेत असें प्यारेलाल-जींनीं लिहिलें आहे ( 'हरिजन' जून १६, १९४६). शिवाय कै. महादेव देसाई किंवा श्री. प्यारेलालजींसारखे चालतेबोलते ग्रंथराज त्यांच्या जवळ सदाच सुसज्ज असत.

## गांधीजींचा आत्मविश्वास

आपलें पत्र 'मतपत्र' होय, व आपल्या मतपत्राचें सामर्थ्यहि केवढें मोठें आहे ह्याची गांधीजींनाहि जाणीव होती. " 'हरिजना'ची मुस्कटदाबी झाली तर--" ( जुलै १९, १९४२ ) अशा आशयाच्या 'हरिजनां'तील लेखांत ते म्हणतात: " Let it be known too that 'Harijan' is a views-paper as distinguished from a news-paper. People buy it and read it not for amusement but for instruction and regulating their conduct. They literally take their weekly lessons in non-violence. " ह्या उताऱ्याचा अर्थ 'हरिजना'पुरताच असून तो त्या काळच्या संदर्भानेंच घ्यावयास पाहिजे. संपूर्ण पत्रविज्ञानाबद्दलचें गांधीजींचें मत कळण्यासाठीं, त्यांच्या पत्रविज्ञानाच्या विशाल कल्पनेचें सम्यक् दर्शन होण्यासाठीं, तसेंच आजच्या काळांत जी मुद्रणस्वातंत्र्याची मुस्कटदाबी होत अस-तांना दिसते व तिच्या मर्यादेविषयीं पत्रविज्ञान-व्यवसायांत जें धुकें निर्माण झालें त्याहि बाबतींत, तीस वर्षांपूर्वीचे गांधीजींचे पुढील शब्द मार्गदर्शक ठरतील :

" Liberty of the Press can be said to be truly respected only when the press can comment in the severest terms upon and even misrepresent matters, protection against misrepresentation or violence being secured not by an administrative gagging order, not by closing down the press but by pushing the real offender, leaving the press itself unrestricted " 'यंग इन्डिया' ( जाने. १२, १९२२ ).










श्री. ह. कृ. मोहनी

# आचार्य विनोबा यांचें व्यक्तित्व

## पहिला सत्याग्रही

दक्षिण हैद्राबादनजीकच्या शिवरामपल्ली येथील तिसऱ्या सर्वोदयसमाजाच्या संमेलनापासून किंवा तेलंगणप्रांतांतील पदयात्रेपासून आचार्य श्री. विनोबा ह्यांचे व्यक्तिमत्त्व अखिल भारतांत मोठ्या प्रमाणांत सुविख्यात झालें, एवढेंच नाहीं तर जगांतील कांहीं थोड्या सुसंस्कृत राष्ट्रांत ह्या असाधारण व्यक्तिमत्त्वाबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली. सर्वोदयसमाज ही संघटना सांप्रत हिंदुस्थानांत मशहूर झालेली आहे. गांधीमताचे ३।४ हजार लोक गांधीजींच्या मृत्यूनंतर वैचारिक देवघेवीसाठीं भारतांतील निरनिराळया प्रदेशांत एकत्र जमूं लागले. आणि भ्रातृभावाचा हेतु ठेवून, विरल अशी संघटना निर्माण करून त्या संघटनेस सर्वोदयसमाज हें नांव गांधीमताच्या लोकांनीं दिलें.

हैद्राबाद संस्थानांतील तेलंगण प्रांतांत साम्यवादी लोकांनीं अलीकडे गेल्या पांचदहा वर्षांत, तेथील विशिष्ट आर्थिक विषमतेच्या अन्याय्यी दारुण परिस्थितीचा फायदा घेऊन आपलें वैचारिक महत्त्व हिंदुस्थानभर स्थापन करण्यासाठीं त्यागपूर्ण असें क्रांतिकारक आंदोलन सुरू केलें होतें, आणि कांहीं प्रमाणांत साम्यवादी विचारसरणीच्या पुढाऱ्यांस तेथें यशही मिळालेलें होतें असें म्हणतां येतें. हैद्राबादसंस्थानांत तेलंगण हा लहानसा विभाग आहे. हैद्राबाद संस्थान स्वतंत्र भारतांत विलीन झाल्यानंतर साम्यवादी विचारसरणीस सर्वस्वीं अनुकूल असणाऱ्या तेथील आर्थिक परिस्थितींत कांहींसा बदल झाला. तथापि तेथील जनतेवरील साम्यवादी विचारसरणीचा पगडा अनेक प्रकारच्या विषम व अन्याय्य आर्थिक विभागणीमुळें कायमच राहिला.

विनोबांनीं खेडोंपाडीं पायीं पर्यटन सुरू केल्यामुळें जनतेची भयंकर दैन्यावस्था त्यांना अगदीं जवळून पाहतां आली आणि भूमीचें अन्याय्य वितरण थांबविल्याशिवाय भारताचा आर्थिक प्रश्न योग्य रीतीनें सोडविला जाणार नाहीं असें स्फुरण तेलंगणांतील परिस्थिति पाहून त्यांना झालें. श्रीमंतांनीं गरिबांस खखुषीनें भूमीचें दान केल्याशिवाय अहिंसक रीतीनें आर्थिक विषमतेचा प्रश्न सुटणें अशक्य आहे असा प्रत्यय विनोबांस झाला आणि आर्थिक पुनर्रचना करावी ह्या उद्देशानें भूमिदानयज्ञाचा संदेश तेलंगणांतील एका खेडेगांवांत विनोबांनीं दिला. आपला संदेश जनतेस पटूं शकेल असा अधिकाधिक विश्वास विनोबांच्या हृदयांत उत्तरोत्तर वाढीस लागला, आणि सांप्रत अखिल भरतखंडांत, आपलें सर्वस्व पणांस लावून विनोबा हा संदेश पसरवीत चाललेले आहेत. एक अभूतपूर्व अशा नवीन आंदोलनाचें स्वरूप ही भूमिदान यज्ञाची चळवळ धारण करील असें दिसत आहे.

अखिल जगतीतलावरील आर्थिक दृष्टीनें निष्प्राण

आचार्य विनोबा यांना नुकतींच गेल्या ता. ११ सेप्टेंबरला ५९ वर्षें पूर्ण होऊन त्यांनीं ६० व्या वर्षांत पदार्पण केलें.– प्रस्तुत लेखांत त्यांच्या व्यक्तित्वाचें करून दिलेलें दर्शन वाचकांस समयोचित व उद्बोधक वाटेल–का. सं.

व असहाय झालेल्या जनतेमध्यें साम्यवादी विचारसरणीनें विलक्षण पकड मिळविलेली आहे. त्या परिणामकारक विचारसरणीची पकड भारतांत ढिली होऊन, त्या जागीं आर्थिक उन्नतीची, आर्थिक क्रांतीची एक नवीन आशा, आर्थिक समानता-स्थापनेचा एक नवा श्रेयस्कर मार्ग, नैतिक वैभव दाखविणारें एक नवें आकर्षक क्षितिज निष्कांचन जनतेमध्यें विनोबा निर्माण करीत आहेत. भूदान-यज्ञाच्या संदेशास केवळ भारतीय महत्त्व आहे असें नाहीं, तर हिंदुस्थानांत त्या संदेशास साफल्य आल्यास, हळुहळू जागतिक महत्त्वहि त्यास प्राप्त होण्यासारखें आहे. भूदानयज्ञ हा आजचा जागतिक प्रश्न होण्याइतका अर्थपूर्ण संदेश आहे. वंश व देश ह्यांनीं स्थापन केलेल्या मालकी हक्काच्या अन्याय्य आर्थिक मर्यादा बाजूस सारून अखिल मानवजातीचें कल्याण साधणारा हा भूमिदानयज्ञाचा संदेश आहे. देशाभिमान, वांशिक श्रेष्ठता आणि वर्णभिन्नता ह्या भावनांना अवास्तव मूल्य सुसंस्कृत म्हणविणाऱ्या राष्ट्रांनीं गेल्या तीनशें वर्षांत दिल्यामुळें श्रीमंत आणि गरीब ह्या वर्गांमध्यें अनुल्लंघनीय असे पर्वत उभे राहिलेले आहेत आणि राष्ट्राराष्ट्रांतील द्वेष, श्रीमंत आणि गरीब ह्या वर्गांमध्यें अन्याय्य आर्थिक वितरणामुळें पडलेली महान् फूट ही पराकोटीस पोंचलेली आहे. विनोबा प्रसृत करीत असलेला भूमिदानयज्ञाचा संदेश जागतिक एकीकरणास साहाय्य करणारा, विशाल आणि दिव्य असा आदेश आहे. म्हणून विनोबा हे वंदनीय भारतीय विभूति आहेत, एवढेंच नाहीं तर जागतिक महत्त्व पावणारे भविष्यकालीन नवसंस्कृतीचे संदेशवाहक महापुरुष आहेत असें त्यांच्याबद्दल म्हणतां येण्यासारखें आहे.

आपल्या विभूतिमत्त्वाच्या सामर्थ्यावर विनोबांनीं लक्षावधी एकर जमीन हिंदुस्थानच्या जनतेकडून संपादन करून आश्चर्यकारक अद्भुत दृश्य दाखविलेलें आहे. जन्मभर केलेल्या तपश्चर्येमुळें हा असामान्य अधिकार विनोबांस प्राप्त झालेला आहे. ज्वालामुखी जेव्हां पेट घेतो किंवा धरणीकंपानें जेव्हां पृथ्वी हादरते तेव्हां सृष्टींत विशाल घटना झालेल्या नजरेस पडतात. त्यापूर्वीं अनेक वर्षे पृथ्वीच्या पोटांत अंतर्गत घडामोडी निस्तब्धपणानें चालू राहातात, पण त्यांचें दृश्य असें स्वरूप नजरेस येत नाहीं. गांधीजींच्या मृत्यूनंतर विनोबांच्या हृदयांत आपल्यावरील विशिष्ट जबाबदारीच्या जाणीवेची, त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत उलटापालट करणारी धगधग सुरू झाली. सर्वोदयसमाज हा त्याच जबाबदारीच्या विचारांचें पर्यवसान आहे, आणि भूदानयज्ञाचें आंदोलन हें त्या क्रांतिकारक विचाराचें फल आहे. गांधीजींनीं दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभीं अत्यंत कठीण आणि घोरतर अशा प्रसंगीं युद्धविरोधी आंदोलन आपला अहिंसक संदेश जगजाहीर करण्याच्या हेतूनें सुरू केलें, आणि प्रथमचे सत्याग्रही वीर म्हणून विनोबांची निवड केली होती हें सर्वांस विदित आहेच. गांधीजींच्या जीवनांत हा समय किती निर्वाणीचा व कसोटीचा होता आणि गांधीजींचें असामान्य व्यक्तिमत्त्व ह्या वेळीं कसें पणास लागलें होतें हें हिंदुस्थानचे राष्ट्राध्यक्ष बाबू राजेन्द्रप्रसाद यांनीं गेले वर्षींच गांधी-सेमिनारमधील त्यांच्या समारोपाच्या भाषणांत निरपवाद पद्धतीनें आणि अत्यंत उत्कृष्ट रीतीनें विशद केलें आहे. प्रथमचे सत्याग्रही म्हणून विनोबांची गांधीजींनी केलेली निवड हिला जागतिक महत्त्व कसें होतें हें ह्या भाषणावरून सहज स्पष्ट होण्यासारखें आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या असामान्य धीरोदात्त प्रसंगीं आपला युद्धविरोधी धोरणाचा संदेश जगजाहीर करण्यासाठीं, आपल्या स्वत:च्या ऐवजीं ज्यांची प्रथम सत्याग्रही म्हणून गांधीजींकडून निवड झाली, त्या पुरुषश्रेष्ठामध्यें गांधीजींच्या मृत्यूनंतर गांधी-



अनुक्रमणिका








जींचा आत्मा अधिक प्रमाणांत समाविष्ट झालेला दिसावा ही क्रमप्राप्तच घटना आहे. गांधीजींच्या मृत्यूनंतर विनोबांनीं अखिल हिंदुस्थानभर दौरा केला; घरादारांस विन्मुख झालेल्या असहाय अशा लक्षावधी निराश्रितांस, निर्वासितांस आश्वासन दिलें; जनतेचें सूक्ष्म निरीक्षण केलें; स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या अन्नधान्यादिकांच्या भारतांतील कठीण समस्या समजून घेतल्या. त्याच अहर्निश चिंतनाचा भूमिदानयज्ञाची स्फूर्ति हा परिणाम आहे. सत्याग्रह्याची प्रथम पदवी गांधीजींकडून मिळविलेल्या सत्याग्रही वीराची भूमिदानयज्ञ ही भारतीय दिग्विजयाची मोहीम आहे असें ह्या आंदोलनाचें वर्णन करितां येईल.

## तत्त्वज्ञ आणि कर्मयोगी

यज्ञ किंवा स्वार्थत्याग ह्या गुणाची परिसीमा विनोबांनीं आपल्या आयुष्यांत करून दाखविलेली आहे. हा स्वार्थत्याग बुद्धियुक्त व्हावा अशी आकांक्षा व निष्ठा जन्मभर बाळगून विनोबांनीं आपल्या जीवनाचें अति दिव्य केलेलें आहे. वेद आणि वेदांगें ह्यांचें सूक्ष्म ज्ञान विनोबांनीं संपादन करून स्थितप्रज्ञदर्शनाचा ध्यास बाळगला आहे. ध्येयाप्रीत्यर्थ प्राणसमर्पण करण्याची, सत्कार्यार्थ मृत्यूस कवटाळण्याची, तळहातावर शिर घेऊन तें नाचविण्याची कसरत त्यांनीं जन्मभर चालविलेली आहे. धर्मज्ञता, पांडित्य, कर्मयोग, भक्ति, ज्ञान व वैराग्य, अथवा तत्त्वज्ञता, नीति व आचार ह्या मंगलमय मूल्यांनीं आपलें जीवन ओतप्रोत भरून काढण्यासाठीं विनोबांनीं आटोकाट प्रयत्न केलेला आहे.

गांधीजींनीं निर्माण केलेल्या दिव्य आदर्शाच्या सिद्धीसाठीं विनोबांनीं आपल्या जीवनास निर्माल्यवत् मानून गांधीजींच्या हयातीपर्यंत त्या आदर्शाची पूजा केली. कुमारवयांतील कौटुंबिक धार्मिक शिस्त व सुसंस्कार, अभ्यासमंडळें, पुस्तकालयें, शालेय संस्था आणि इतर बुद्धिपोषक वातावरण ह्यांच्या मधून त्यांनीं संपादन केलेलें ज्ञान, वाई येथील प्राज्ञपाठशाळेंतून मिळविलेलें वेदान्तदर्शन, आणि गांधीजींच्या सत्याग्रहाश्रमांतील व्रताचरण ही सर्व साधना गांधीजींनीं प्रसृत केलेल्या देशोद्धाराच्या अहिंसामय उद्दिष्टपूर्तीसाठीं विनोबांनी कामीं आणली. वर्ध्याचा आश्रम, वर्ध्याच्या आसमंतांतील ग्रामसेवासंघटन आणि विनोबांचे विधायक कार्यातील नानाविध उद्योग हें सर्व गांधीविचारनिष्ठेचें बाह्य आचारात्मक स्वरूप होतें. गांधीजींच्या मृत्यूनंतर विनोबांची स्वतंत्र प्रज्ञा जागृत होऊन भूदानयज्ञ- देवाची आराधना त्यांनीं चालविलेली आहे. गांधीजींच्या आदर्शाच्या पायावर यज्ञदेवाचें हें मंदिर उभारून दिलेलें आहे. गांधीजींनीं निर्माण केलेल्या विधायक कार्यपरंपरेचा कोठलाच भाग असा नाहीं कीं ज्यांत विनोबांचें वैशिष्ट्य चमकून उठलेलें नाहीं. सांप्रदायिक एकता साधण्यासाठीं विनोबांच्या इतके प्रयत्न अत्यंत विरल आहेत. वर्धा, नालवाडी व परंधाम येथील खादीकार्यात त्यांच्या प्रज्ञेनें नवीन उन्मेष सारखे दाखविले आहेत. ग्रामसफाईत विनोबांनीं काय परिश्रम केले त्याची साक्ष सुरगांव देत राहील. वर्ध्याच्या महिलाश्रमाचा इतिहास स्त्रियांच्या उन्नतीसाठीं विनोबांनी घेतलेले वस्तुपाठ आहेत असें म्हणता येतें. शेतीची सुधारणा, कुष्ठरोगनिवारणसंस्था, गोसेवा, राष्ट्रीय भाषांचा अभ्यास, ग्रामोद्योग, राष्ट्रीय शिक्षण, जातिनिराकरण, आरोग्य किंवा स्वास्थ्य, मद्यपानबंदी वगैरें कामें हीं विधायक कार्यें नजरेसमोर जरी आणलीं तरी विनोबांचें व्यक्तित्व त्यांत समाविष्ट झालेलें नाहीं असें आढळून येणार नाहीं. त्यांच्या आयुष्यांतील निरनिराळ्या कालीं अनेक प्रकारच्या विधायक कार्यांत विनोबा समरस होऊन रंगून गेले आहेत असें दिसून येईल. एकादश-व्रतांच्या दृष्टीनें विचार केल्यास, विनोबांइतकी ह्या गुणांच्या आराधनेसाठीं व



अनुक्रमणिका








प्रकर्षासाठीं तपश्चर्या एकाद्याच व्यक्तीनें क्वचित् केली असेल असें अतिशयोक्ति न करतां म्हणता येण्यासारखें आहे.

जसा एखादा थोर भौतिक शास्त्रज्ञ प्रयोगशाळेंत आपले प्रयोग करण्यांत सदैव गुंग राहतो, त्याला जगाचें भान देखील राहात नाहीं, त्याचप्रमाणें गांधीजींचा आदर्श मनांत व आचरणांत उमटविण्यासाठीं गांधीजींच्या हयातींत विनोबा स्वतः निर्माण केलेल्या वातावरणांत व प्रयोगशाळेंत निमग्न राहिले. येथील सर्वोदयसमाजाच्या संमेलनांत आपण एक जंगली मनुष्य आहोंत असें त्यांनी स्वतःचें वर्णन केलें होतें. जगाच्या संसारापासून विनोबा अलिप्त राहिलेले होते आणि एकांतप्रिय असें जीवन त्यांनीं बनविलेलें होतें. गांधीजींच्या विशाल अश्वत्थवृक्षास विनोबांची एक रसपूर्ण अशी पारंबी चिकटलेली दिसत होती, परंतु आज त्याच पारंबीचा महान् वृक्ष गांधीजींच्या मृत्यूनंतर झालेला आपणांस दिसून येत आहे.

## मुनीचा लोकसंग्रह

भूदानयज्ञासाठीं विनोबांचा जसा जसा संचार चालू आहे, तसतसे त्यांच्या स्वभावांतील किंवा व्यक्तिमत्त्वांतील निरनिराळे पैलू अथवा छटा दृष्टिगोचर होऊं लागल्या आहेत. विनोबांच्या व्यक्तिमत्त्वाच्या दोन बाजू आहेत असें म्हणता येतें. गांधीजींच्या हयातींतील विनोबा एक महान् पंडित, तत्त्वज्ञ, मुनि, यति किंवा तपस्वी असे भासतात. विनोबांचा निसर्गदत्त स्वभाव तीक्ष्ण आणि तापट होता असें दिसतें. त्यांनीं आपल्या तपश्चर्येनें तो कमावून मृदु केलेला आहे. लोखंडापासून जसें पोलाद तयार करतात, त्याप्रमाणें विनोबांच्या स्वभावाचें परिवर्तन झालेलें आहे. गांधीजींच्या हयातीनंतरचे विनोबा, धर्मज्ञ, नीतिज्ञ, संत, साधु, व्यवहारकुशल राजकारणी मुत्सद्दी असे दिसून येऊं लागले आहेत. एका महान् कार्यासाठीं त्यांना आतां लोकसंग्रह करणें आवश्यक आहे ह्याची जाणीव पूर्णपणें झालेली आहे. प्रत्येक सविनय कायदेभंगाच्या आंदोलनानंतर जेव्हां विनोबा जेलमधून बाहेर पडले, तेव्हां त्यांच्या स्वभावांत स्पष्टपणें बदल होत गेला; असें त्यांचे निकटवर्ती समजूतदार चिकित्सक लोक म्हणूं लागले. विशिष्ट कार्यतत्परतेमुळें जनतासंपर्क जसजसा वाढीस लागतो, तसतसा मुनींच्या किंवा तपस्वी पुरुषांच्या हृदयाचा पालट होत जातो. ह्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. विशिष्ट ध्येयाप्रीत्यर्थ केलेल्या तपश्चर्येच्या अनुरोधानें मुनींची आत्मनिष्ठ अशी प्रवृत्ति वाढत असते. परंतु वस्तुनिष्ठतेची किंवा लोकहितैकपरतेची जसजशी मुनीस आवश्यकता वाटूं लागते, तसतशी त्याची अंतर्मुख दृष्टि आणि बहिर्मुख दृष्टि ह्यांच्यामध्यें मिलाफ घडून येत आहे असें दिसून येऊं लागते, त्यांच्यांमध्यें एकात्मता निर्माण होऊं लागते.

दीडदोन वर्षांपूर्वीं उत्तरप्रदेशांत भरलेल्या सेवापुरी येथील सर्वोदयप्रसंगीं पंडित गोविंदवल्लभ पंत ह्यांच्यासारख्या अत्यंत कार्यक्षम महामंत्र्यानें आणि इतर मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं विनोबांस संत म्हणून आवाहन केलें. त्याच वेळीं महाराष्ट्रीय सर्वोदयी कार्यकर्त्यांपुढें बोलतांना महाराष्ट्रीय संतसंस्कृति मागें पडलेली आहे आणि म्हणून तिच्याबद्दल निष्ठा पुनः जागृत केली पाहिजे ह्या विचारावर विनोबांनीं पुष्कळ जोर दिला. विनोबांमध्यें संतसंस्कृतीबद्दल जागरूकता लहानपणापासूनच आहे. आणि विनोबांचा जनतासंपर्क जसजसा घनिष्ठ होत चालला आहे, तसतसा संतपणाचा आविष्कार त्यांच्या स्वभावांत अधिक प्रमाणांत होत आहे. तथापि विनोबांच्या व्यक्तित्वावर ' संत ' म्हणून शिक्कामोर्तब करणें प्रस्तुत परिस्थितींत कितपत योग्य ठरेल हा विचाराचाच प्रश्न आहे. कारण, विनोबांचें व्यक्तिमत्त्व गांधीजींच्या



अनुक्रमणिका








मृत्यूनंतर अनेक मार्गांनीं वाढीस लागलें आहे. अनेक भारतीय व जागतिक सद्विचारांचे व सत्संगाचे प्रवाह त्या व्यक्तित्वांत समाविष्ट होण्याचा संभव आहे. आचार्य विनोबांमध्यें संतत्व प्रकर्षानें उदय पावत आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. त्यांच्यामध्यें महर्षिपदाचे गुण, द्रष्टेपण किंवा दिव्यदर्शित्व हें देखील समाविष्ट होऊं लागलें आहे. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य संस्कृतीचें एकीकरण करणारे, एका नवीन समन्वयाचे प्रवर्तक म्हणून विनोबांचें नांव आगामी कालांत गाजेल. महानदी ज्याप्रमाणें अनेक प्रवाहांचें मीलन होऊन विविध मुखांनीं समुद्रास मिळते त्याप्रमाणें विनोबांचें व्यक्तित्व उदात्ततेनें व भव्यतेनें विशालता पावत आहे.

## एकाच व्यक्तित्वाचीं दोन भव्य चित्रें

विनोबांच्या थोर व्यक्तित्वाचा आरंभ तत्त्व-चिंतनानें किंवा तत्त्ववादी वृत्तीनें झालेला आहे. स्वतःच्या अभ्यासाप्रमाणें व ग्रंथव्यासंगाप्रमाणें ब्रह्मचर्यव्रताची व्याख्या करून आणि त्या व्रताची दीक्षा घेऊन, वेदान्त, ब्रह्म आणि ईश्वर ह्या महान् संज्ञांबद्दल, मूल्यांबद्दल आणि ध्येयाबद्दल आपली निष्ठा व संकल्प दृढ करून जगत्-हिताकडे वळलेले असे ते महापुरुष आहेत. अमूर्तापासून मूर्ताकडे त्यांच्या मानसिक विचारांची व वृत्तीची प्रगति होत आहे. अहिंसा, सत्य, अस्तेयादि महाव्रतें किंवा नैतिक गुण हे अमूर्तत्वानें, तात्त्विक बुद्धीनें आकारास आणलेले, पूर्णत्वाच्या कल्पनेंतून प्रगट झालेले असे विनोबांच्या व्यक्तित्वांत भासमान होतात. वास्तवापासून ( realism ) ध्येया-( idealism ) कडे, वासनेपासून निर्वाणाकडे, संसारबंधापासून मुक्तीकडे, गृहस्थाश्रमाकडून संन्यासाकडे, संतत्वापासून स्थितप्रज्ञत्वाकडे अशी त्यांच्या मानसिक प्रगतीची वाटचाल आहे असें म्हणतां येत नाहीं. ‘ तत्त्वम् असि ’ किंवा ‘ अहं ब्रह्मास्मि ’ ह्या वेदान्तपरिभाषेंतील महावाक्यांतील ‘ तत् ’ पदाचें किंवा ‘ ब्रह्म ’ ह्या पदाचें प्रथम अधिष्ठान त्यांच्या बुद्धीनें मानून आपली जीवनयात्रा त्यांनीं त्या आधारावर आंखलेली आहे असें अनुमान करण्यास जागा आहे.

गांधीजींनीं सामान्य सांसारिक, पापपुण्यमय अशा वस्तुनिष्ठ गृहस्थाश्रमी जीवनावर ईश्वर, मोक्ष, निर्वाण यांकडे जाणारी आपल्या प्रगतीची सोपानपरंपरा बनविली. त्यांच्या शिष्यवरानें आपल्या जीवित-साफल्याचा, उन्नतीचा, मोक्षप्राप्तीचा क्रम निराळ्या पद्धतीनें सुरू केलेला आहे. विनोबांचें जीवनाचें तर्कशास्त्र deductive आहे, तर गांधीजींचें जीवनशास्त्र Inductive होतें असें कदाचित् म्हणतां येण्यासारखें आहे. आणि म्हणून ह्या दोन महापुरुषांच्या व्यक्तिमत्त्वाचा संसार निरनिराळ्या श्रेणीचा आहे असें दिसून येतें. जागतिक कल्याणाच्या दृष्टीनें पाहता लोकहिताचा अहिंसामय मार्ग दोघांनीहि घेतल्यामुळें एकाच व्यक्तित्वाचीं हीं दोन भव्य चित्रें आहेत असें तटस्थपणानें अवलोकन करणारांस म्हणतां येईल.

---

## तीं तुझींच पाउलें — !

दक्षिण आफ्रिकेंत ज्यांचा मागोवा घेत असतांनाच
सत्य व अहिंसा यांना आपल्या क्रान्तिकारी
सामर्थ्याचा पहिला साक्षात्कार झाला,
चम्पारण्याच्या परिसरांत दलितांसाठीं
जीं अचल, अमल उभीं राहिलीं,
दांडीच्या सागरतीरावर ज्यांच्या दर्शनानें
सारा भारतवर्ष हेलावून उचंबळला,
नोआखलीच्या शापग्रस्त भूमींत
ताप-अनुतापाच्या आंसवांनीं जीं न्हाऊन निघालीं,
तीं तुझींच पाउलें—
तीं तुझींच पाउलें
भावी भूकंपांचें निराकरण करीत
आज बिहारच्या भूमीवर उमटत आहेत.

— देवदत्त दाभोलकर









अनुक्रमणिका

डॉ. गो. रा. केळकर व श्री. श्री. ग. बेडेकर

# शास्त्रीय परिभाषेचा प्रश्न

भौतिक शास्त्रासंबंधींचें अद्ययावत् वाङ्मय आज पाश्चात्त्य भाषांमध्येंच आहे. त्यामुळें भौतिक शास्त्रीय ज्ञान मिळविण्याकरितां इंग्रजी सारख्या एखाद्या पाश्चात्त्य भाषेचा चांगला परिचय असणें आवश्यक झालें आहे. आपल्या दररोजच्या जीवनांत शास्त्रीय ज्ञानावर आधारलेल्या साधनांचा उपयोग जास्त जास्त होऊं लागला असून त्यामुळें बहुजनसमाजास शास्त्रीय ज्ञानाचा लाभ होणें महत्त्वाचें आहे व त्याकरितां भाषेची अडचण दूर झाली पाहिजे, शास्त्रीय ज्ञान भारतांतील प्रादेशिक भाषांतून उपलब्ध झालें पाहिजे. मातृभाषांतून शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करावयाचा असेल तर परिभाषेचा प्रश्न साहजिकच पुढें उभा राहतो.

शास्त्रीय परिभाषेसंबंधीं मुख्यतः दोन परस्परविरोधी विचार प्रतिपादिले जातात. शास्त्रीय वाङ्मयांतील सर्व पारिभाषिक शब्द जसेच्या तसे इंग्रजीच ठेवावे व त्यांचें स्पष्टीकरण व आनुषंगिक माहिती मातृभाषेंतून द्यावी असें म्हणणारांचा एक पक्ष व एकूणएक संज्ञांच्या जागीं संस्कृत अथवा संस्कृतोद्भव प्रतिशब्द बनवून ते वापरावे असें म्हणणारांचा दुसरा पक्ष.

पहिल्या पक्षाचा पुरस्कार अनेक प्रसिद्ध भारतीय शास्त्रज्ञांनीं केलेला आढळतो. दुसऱ्या विचारसरणीनुसार डॉ. रघुवीर यांनीं दीर्घ प्रयत्न करुन अनेक नवीन पारिभाषिक शब्द बनविले आहेत. वास्तविक हे दोन्ही विचार एकान्तिक स्वरूपाचे असून दोहोंतील तथ्यांश घेऊन काढलेला स्वतंत्र मार्गच श्रेयस्कर ठरेल.

डॉ. रघुवीर यांच्या व्यासंगाबद्दल व मेहनतीबद्दल कोणासही आदरच वाटेल; पण एकूणएक परकीय शब्द काढून त्यांच्या जागीं संस्कृत प्रतिशब्द वापरण्याचा किंवा त्यांचें भाषांतर करण्याचा त्यांचा आग्रह खालील तीन बाबतींत अयोग्य वाटतो:

( १ ) कांहीं परकीय शब्द व कांहीं स्वकीय रूढ शब्द सतत उपयोगामुळें सामान्य लोकांना सुद्धा परिचित झाले आहेत. उदाहरणें म्हणून रबर, सीमेंट, ॲल्युमिनम्, लोह हे शब्द घेतां येतील. यांच्या जागीं अनुक्रमें घृषी, वज्रचूर्ण, स्फत्धातु व आयस् हे बोजड शब्द वापरल्यानें कोणाचा कार्यभाग साधतो ?

( २ ) ॲंपेअर, व्होल्ट, क्यूरी यासारख्या संज्ञा थोर शास्त्रज्ञांच्या गौरवार्थ दिल्या गेल्या आहेत. त्या बदलणें शिष्टाचारसंमत होणार नाहीं. डॉ. रघुवीर यांनीं अशा संज्ञांची पार्श्वभूमि लक्षांत न घेतां त्यांचीही हकालपट्टी केली आहे. ‘रामन इफेक्ट’, ‘जोशी इफेक्ट’ या संज्ञांचीं पाश्चात्त्यांनीं भाषांतरें केलीं व त्याऐवजीं नवीन संज्ञा बनवून वापरल्या तर आपणांस कसें वाटेल याचा विचार आपण करायास हवा.

( ३ ) सर्व शास्त्रज्ञांनीं मान्य केलेल्या आंतरराष्ट्रीय मापनपद्धतींतील ‘ग्रॅम’, ‘सेकंड’ इ. संज्ञा बदलणेंही असेंच अयोग्य आहे. तसेंच ‘क्वान्टम्’, ‘टाईम–स्पेस–कान्टिनम’ अशासारखे सिद्धांतवाचक कांहीं कांहीं विशेष शब्द अथवा शब्दसमुच्चय आहेत ते तसेच ठेविले पाहिजेत.

नवीन शब्द बनविण्याची डॉ. रघुवीर यांची आवड कित्येकदां इतकी अनावर झालेली आढळते कीं चांगला रूढ असलेला शब्द, परकीय नसून, शुद्ध संस्कृत, सोपा, साधा, सुटसुटीत असला तरी त्याऐवजीं स्वतः बनविलेला एखादा क्लिष्ट शब्द योजिल्याशिवाय त्यांना राहवत नाहीं. यासंबंधीं








कांहीं उदाहरणें उल्लेख करण्यासारखीं आहेत. 'वायु' व 'द्रव' हे शब्द सर्वांस परिचित आहेत पण डॉ. रघुवीर त्यांच्या ऐवजीं 'वाति' व 'तरल' हे शब्द सुचवितात. लोखंडाला लोह हा संस्कृत शब्द आहे व थोड्याफार अपभ्रष्ट रूपांत कांहीं प्रादेशिक भाषांतही तो आढळतो, पण म्हणूनच कीं काय डॉ. रघुवीर त्याच्या ऐवजीं 'आयस्' हा शब्द सुचवितात. त्यांच्या अशा धोरणानें शास्त्रीय वाङ्मय सुबोध होईल कीं दुर्बोध होईल तें खालील उदाहरणांवरून वाचकांनींच ठरवावें. डॉ. रघुवीर यांच्या परिभाषेचें एक उदाहरण असें :

"एक धान्य प्रवाष्पाचें पाणी होताना त्यांतून बाहेर पडणाऱ्या ऊष्म-राशीची परिशुद्ध अर्हा माहीत असल्यास पुढें वणन केलेल्या प्रवाष्प उष्णमानाच्या (उषमानाच्या ?) साहाय्यानें वस्तूच्या आपेक्षिक ऊष्म्याचें निश्चयन करतां येतें." हेंच सोप्या मराठींत असें लिहितां येईल:

"एक ग्रॅम वाफेचें पाणी होतांना त्यांतून बाहेर पडणाऱ्या उष्णतेची अचूक किंमत माहीत असल्यास पुढें वर्णन केलेल्या उष्णतामापकाच्या साहाय्यानें वस्तूची विशिष्ट उष्णता निश्चित करतां येते." *

एकूणएक परकीय शब्दांचें भाषांतर अथवा त्या ऐवजीं प्रतिशब्द न वापरल्यास शास्त्रीय वाङ्मयांत फक्त क्रियापदें व विशेषणेंच काय तीं प्रादेशिक भाषांतील राहतील असें समजणारांचा एक पक्ष आहे. वर दिलेल्या सुबोध मराठी उताऱ्यांत असें झालें आहे काय हें त्यांनीं पडताळून पहावें. अशीच आणखी कित्येक उदाहरणें देतां येतील.

वास्तविक शास्त्रीय परिभाषेचा प्रश्न सोडवूं पाहणारांनीं एक मुख्य गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती म्हणजे शास्त्रीय माहितीचा बोध सुलभतेनें व अचूक व्हावा हें साध्य असून त्यासाठीं परिभाषा केवळ साधन आहे. तेव्हां कांहीं रूढ परकीय किंवा लोकभाषिक शब्दांचा स्वीकार करावा लागला तर तो योग्यच ठरेल.

पुणें येथें प्रा. सुनीतिकुमार बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं नुकत्याच होऊन गेलेल्या भारतीय भाषाविकास-परिषदेमध्यें परिभाषेचा प्रश्न बऱ्याच उच्च पातळीवरून व चांगल्या तऱ्हेनें चर्चिला गेला असल्यामुळें त्या परिषदेमध्यें संमत झालेल्या ठरावांचा गोषवारा पुढें दिला आहे :

आंतरराष्ट्रीय मान्यता पावलेलीं चिन्हें (Symbols and Signs) व सूत्रें (Formulae) म्हणजे मूलद्रव्यें दर्शविणारीं चिन्हें, रासायनिक प्रक्रिया दाखविणारीं समीकरणें, गणितांतील अधिक, उणें यांसारखीं चिन्हें इत्यादि आहेत तशींच वापरावीं. याशिवाय आंतरराष्ट्रीय संज्ञा (Terms) व शब्दसमुच्चय (Expressions) यांच्या जागीं अन्वर्थक शब्दयोजना करतां न आल्यास तेही आहेत तसेंच ठेवावे. इतर सर्व पारिभाषिक शब्द शक्य तों संस्कृतापासून केलेले असावे व अखिल भारताची शास्त्रीय परिभाषा एकच असावी.

या ठरावांतील कांहीं बाबींसंबंधीं मतभेद असणें शक्य आहे. तरी ठरावांचें एकंदर धोरण उदार व वास्तवतेस धरून असल्यामुळें परिभाषेचा प्रश्न समाधानकारकपणें सुटण्यास त्यांची फार मदत होईल असेंच कोणाही विचारी मनुष्यास पटेल.

परिषदेचें उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीनें आणखीही एक योजना होणें आवश्यक वाटतें. ती म्हणजे आज मान्य केलेल्या परिभाषेचा उपयोग करून जें कार्य होईल त्याचा वेळोवेळीं आढावा घेतला जावा व त्यावरून पुढील धोरण ठरविलें जावें. या कामीं केवळ भाषाशास्त्रज्ञांनींच निर्णय न घेतां शास्त्रज्ञ, शास्त्रीय विषयांचे शिक्षक व प्राध्यापक यांचेबरोबर विचारविनिमय केला जावा. त्याचप्रमाणें एखाद्या नवीन संज्ञेस मान्यता देण्यापूर्वी लोकांकडूनही त्यासंबंधीं सूचना मागविल्या जाव्या.

अशा तऱ्हेनें शास्त्रीय परिभाषेचा पाया तयार झाल्यावर ती हळूंहळूं समृद्ध होत जाईल. शाळेंतील शास्त्रीय शिक्षण प्रादेशिक भाषांतून देण्यानें तसेंच बहुजनसमाजाकरितां शास्त्रीय वाङ्मय निर्माण करण्यानें या कार्यास मदत होईल.

---

* श्री. श्री. स. पेंढारकर यांनीं संपादक 'युगवाणी' (जुलै १९५३, पान २९) यांस पाठविलेल्या पत्रांतून हे उतारे घेतले आहेत.








श्री. कृष्णचंद्र. अनु.-श्री. मनोहर देखणे

# पांच रुपयांतील स्वातंत्र्य!

घराबाहेर पडलों तेव्हां माझ्या खिशांत पांच रुपये होते, जे आज अडीच रुपयाच्या मोलाचे आहेत. घरनं निघतांनाच मी ठरवलं होतं कीं, यांतली एक दिडकीही माघारी आणायची नाहीं. कितीतरी दिवसांनंतर येवढी मोठी रक्कम आज माझ्या हातीं आली होती! तिचा मनसोक्त उपयोग करून घ्यायचा, दिवसभर मुंबईतून भटकायचं, गोल्डफ्लेकस् सिगारेट प्यायची, पाणी-पुरी खायची, एखादा झकपैकीं सिनेमा पहायचा, एकूण जिवाची मुंबई करायची व रात्रीं बारानंतर घरीं परतायचं—असा विचार करून आणि खांद्यावर रेनकोट टाकून मी बाहेर पडलों. जातां जातां एक अधेली हातीं घेऊन ती आंगठ्यानें वर उडवीत व अलगद् झेलीत म्हणालों, ' चंगळ आहे ! '

घराबाहेर पडून मी ' चार बंगल्या'च्या रस्त्यावर आलों. हा रस्ता सुमारें २०० यार्डानंतर अंधेरीस जाणाऱ्या मुख्य रस्त्याला मिळतो. ' चार बंगल्या'च्या रस्त्याची स्थिति आजकाल भारतासारखी झाली आहे—जो राष्ट्रकुलांत आहे आणि तरीही बाहेर आहे—! ही सडक अर्धी अंधेरीनगरपालिकेच्या ताब्यांत आहे अन् अर्धी वरसोवा-एरिया-कमेटीच्या ताब्यांत. म्हणून कोणीच तिची कदर नाहीं करीत— अन् करत असतील तर जशी आज भारताची जगाकडून होत आहे !

या सडकेच्या दुतर्फा खोलगट जमीन आहे. त्या जमीनीच्या चिखलांत मोठीं रोपटीं आहेत व तसेच खळगेहि पण आहेत, यांतून भरतीसमयीं पाणी सांचलेलं असतं. तें खारं पाणी या किनाऱ्यावर पसरून थेट इथल्या खोलशा भूमींत शिरतं नि झाडं-झुडपं जलाखालीं बुडतात. पण आतां यावेळीं दर्याचं पाणी उतरलं होतं; उतरल्या रेतीवर लहानसान जलचर दृष्टीस पडत होते. त्यांत छोटेमोठे जंतु, किडे, खेंकडे व अन्य समुद्री प्राणी होते. ते रेंगाळत होते, बाहेर येत होते, चालत, फिरत वा सरपटत होते. एक पोरगा चिखलांत उभा राहून खेंकडे धरीत होता. मी शीळ घालून त्याला म्हणालों, ' काय हरदास, मुंबई भटकायला येतोस का ? '

तो म्हणाला, " माझं नांव हरदास नाहीं. भाऊकर आहे. मी तर खेंकडें धरतोय् बघताय् ना ! मी कसला फिरायला जाऊं शकतों ? दिवसभर इथं पाण्यांत उभं राहून खेंकडे धरणार, संध्याकाळीं बाजारांत नेऊन विकणार व मग घरच्यासासाठीं मीठ-मिरची आणणार नी मग जेवून तणावून देणार. माझ्या नशिबांत कुठली आली सफर— ? डफर आयुष्य अन् खेंकडें तेवढे आहेत ! "

" हरदास...नाहीं भाऊकर, दिवसांत किती खेंकडे पकडतोस ? "

' सहा, सात — फारतर दहा - बारा, ' भाऊकर उत्तरला. त्यानें बारक्या जाळयांत ' बाम ' माशाचे तुकडे नीट बांधले व मोठ्या कौशल्यानें तें फिरवून झाडावरून पाण्याच्या खोल डबक्यांत तें फेंकलें. जाळं पाण्यांत बुडालं. परंतु तुरवट वरच तरूं लागलं. त्याकडे बोट करीत मी म्हटलें: ' एवढाले कॉर्कचे तुकडे तूं कोठून आणतोस ?.' भाऊकर मोठ्यानें हंसून म्हणाला: " हे कॉर्कचे नाहींत. कॉर्क तर फार महाग आहे. चंदनाच्या झाडापासनं आम्ही हे करतों. हें लाकूड कॉर्कसारखंच असतं. किंवा त्याहून जादा बेस. " असं म्हणून हलकेंच त्यानं तें जाळं आपल्याकडे ओढून, मग झटक्यानं वर खेंचलं. पण खेंकडाही फार बिलंदर होता. तो चट्‌दिशीं उडाला व पाण्यांत जाऊन पडला. 'साला पळाला' भाऊकर उसनं हंसून म्हणाला. मी हंसत म्हणालों—'हो, पहा तर कसा बदमाष आहे ! पटदिशीं जाळयांतनं सटकला. ' भाऊकर त्यावर म्हणाला: ' फार

---

**'सरगम'** या हिंदी मासिकांत सुप्रसिद्ध हिंदी लेखक कृष्णचंद्र यांची ही कथा आली होती. तिचा हा अनुवाद लेखकांच्या व संपादकांच्या अनुमतीनें केला आहे— अनुवादक.



अनुक्रमणिका







चपळ असतात लेकाचे. आठ हातपाय असतात ना बेट्यांना!'

मी घाबरून विचारलं. 'आठ हातपाय असतात?'

माझ्याबद्दल संशय घेत भाऊकरनें विचारलें 'तुम्ही खेंकडा नाहीं पाहिला?'

मी नकारार्थी मान हलविली तेव्हां त्यानें आपलें जाळें जमिनीवर ठेविलें व काठी चिखलांत खोंवली. मग पिशवींतून एक खेंकडा काढून हांसत म्हणाला: "हा पहा, हे याला आठ हातपाय आहेत. हे फार धारदार असतात. यांनींच बेटे शिकार करतात!" त्यानें चाकूच्या टोकानें खेंकड्याच्या नांगीवर मारलें. लगेच खेकड्याचे पाय उकलले गेले. आता ते पक्क्या दोऱ्यानें बांधल्यामुळें कुचकामी बनले होते.

मी म्हटलं, "केवढ्यांत जाईल हा खेकडा?" तो म्हणाला, "४ आण्यांत."

"आज किती खेंकडे धरलेस तूं?"

"आत्ता तरी हा पहिलाच आहे. अजून मिळतील."

मी त्याच्या हातावर एक चवली दिली. तो म्हणाला, 'चार आण्याचा आहे हा.' मी उत्तरलों: "मला खेंकडा नकोय्. तशीच दिली तुला चवली चहा-पाण्यासाठीं. तूं आज मला बऱ्याच गोष्टींचं ज्ञान दिलंस. आतां आणखी फक्त एक गोष्ट सांग?" त्यानं उभं राहून जाळं पुन्हा पाण्यांत टाकलं व बोलला: 'विचारा की–'–तो पाठमोरा उभा होता. मी विचारलं, 'समज तुला अकस्मात् खूप रुपये मिळाले तर तूं काय करशील?'

एक गिरकी घेऊन तो माझ्याकडे वळला व निमिषार्धांत म्हणाला, "या घाण चिखलांत काम करून माझ्या तळपायांना ज्या जखमा झाल्या आहेत त्यांना आधीं दवापाणी करीन. आणि..."

"आणि काय?"

"आणि मग लगीन करीन." त्यानं जाळं बाहेर काढलं. या खेपेस एकही खेंकडा नव्हता त्यांत. पण एक बारीक चमकती मासोळी आली. ती हातीं घेऊन त्यानें क्षणैक तिच्याकडे पाहिलें व मग परत तिला पाण्यांत सोडून दिलें अन् ती पाण्यांत चपळाईनें तरत असतां तिच्याकडे बघत बसला. ती इवलीशी चंदेरी मासोळी–त्याच्या जीवनाचें सोनेरी स्वप्न–भुर्रकन् पोहत कुठें अदृश्य झाली! भाऊकरनें मस्तक वर करून गगनांत धांवणाऱ्या मेघाकडे बघितलें व एक दीर्घ निःश्वास सोडून तो म्हणाला– "पण माझं लगीन नाहीं व्हायचं."

मी म्हटलं– "कां? आतां तर स्वातंत्र्य आलंय?..."

तो म्हणाला, "हें स्वातंत्र्य तर आभाळांत धांवणाऱ्या त्या ढगाप्रमाणें आहे. मला तर असली आझादी हवीय् जी माझ्या मुठींत येईल, या खेंकड्यासारखी!"

त्याचक्षणीं मला वाटलं कीं, कावसजी जहांगिर हॉलमध्यें भाऊकरचें व्याख्यान ठेवावें व त्याला सारे बडे नेते बोलावून त्यांना विचारावं, 'सांगा, जनतेला या स्वातंत्र्याचा खरा अर्थ समजलाय कीं नाहीं?'

'चार बंगल्या'च्या फाट्यापाशीं बराच वेळ मी ठाकलों. पण वरसोवाहून येणाऱ्या बसेस अशा चिकार भरून येत होत्या, जणूं बंद डब्यांतून मासळी भरलेली असावी! विचार केला आधीं वरसोवास जाऊन तिथनं अंधेरीला जावं. मग वरसोवाची बस धरली. तिथें स्टँडवर एक पान खाल्लं व बसमध्यें जाऊन बसलों. बस तितक्यांत निघालीच. ३॥ आणे तिकिटासाठीं दिले. कंडक्टरनें मजकडे बघून स्मितहास्य केलें. पुन्हां एकवार तो हांसला. मी प्रत्युत्तरात्मक हास्य करणार तोंच त्यानें एक आण्याचें तिकिट माझ्यापुढें केलें. विस्मित होत मी एकदां तिकिटाकडे पाहून परत त्याच्याकडे बघितलें. तो परत एकदा हंसला. पण या हंसण्यांत बरीच बेचैनी होती, फिकीर होती. जणूं तें स्मित म्हणत होतें: "मी बेइमान नाहीं आहे, गरीब आहे. रात्रंदिवस कष्ट करतों. आपलं सारं घर सांभाळतों... तरी पण संभाळतों कसलं म्हणा! कधीं कपडे नाहींत तर कधीं राशन नाहीं. ना कधीं औषधाला पैसा! पगार तोच आहे. वरसोवाची महागाई दसपट वाढलीय् नी त्याच प्रमाणांत कंपनीचा नफा वाढलाय्. वस्तूंचे भावही वाढलेत; परंतु माझें मात्र वेतन तेंच आहे. ह्यांत माझें चहा-सिग्रेटचेहि पैसे नाहीं निघत! सकाळपासनं रात्रींपर्यंत बसमध्यें उभा असतों अन् छताला धरून आणा, दोन आणे, साडेतीन आण्यांचीं तिकिटें फाडतों. ही अंधेरी; ही वरदेवाडी हा शेरूव्हिला; हा चार बंगला आहे. हे वरसोवा आहे. ही अशी माझ्या जीवनाची भ्रमंती आहे. एक घण्टा 'ठेरो'–दोन घण्टा 'चलो!' तिकिटं फाडायचीं; ये, जा पुन्हा ये नि पुन्हा जा...








जमीन कशी आहे ? निळें आकाश कसें आहे ? लाटांवर शुभ्र प्रतिबिंब कसलें झळकतें ? गोऱ्या अंगाचीं माणसं कशाप्रकारें सागर-किनारीं पहुडतात ? काळ्या बटा कशा रीतीनें वाळूवर विखुरतात ?...हें पिकनिक्-कॉटेजांत जाणारे खुशालचेंडू जाणतात. आम्ही तर त्या कॉटेजवरून पुढें जाणारे. ज्यांच्या आयुष्यांत ना पिक्निक् आहे ना कॅटेज ! आतां आपण हे २॥ आणे सोडलेत तर मी चहा, सिगारेट पिईन, पान खाईन. नाहींतर..."—आतां त्या कंडक्टरचें स्मित त्याच्या ओठांत ओढलें जाऊन तिथें एक विषादाची छटा उमटली होती. कपाळावर स्वेदमालिका सांकळल्या होत्या. त्याची खिन्नता घालविण्यासाठीं मी चटकन् हंसलों. अन् मग त्याच्या हांसण्यांत अशी छटा विलसून दिसली जशी पावसांत उन्हाची तिरीप चमकावी ! त्यानें एक समाधानाचा सुस्कारा सोडला व तो पुन्हा तिकिटं फाडूं लागला.

अंधेरीला बस थांबली व मी चर्चगेटचं तिकिट काढलं. मुखाला चव यावी म्हणून एक आणखी पान घेतलं. दोन गोल्ड-फ्लेक्स् घेतल्या. एक खिशांत टाकली व दुसरी शिलगावली. फ्रूट-स्टॉलवर ताजे छान आंबे होते. मी एक जोराचा झुरका त्या आंब्यांवर सोडला व थर्ड क्लासांत जाऊन बसलों. शेजारच्या उतारूच्या हातांतलें वर्तमानपत्र घेऊन पाहूं लागलों. त्या वृत्तपत्राच्या प्रत्येक पृष्ठावर, प्रत्येक स्तंभांत कुठली तरी लाल फौज, लाल देश व कोठल्यातरी लाल धोक्याची माहिती होती. मनांत म्हटलं "हीं भांडवलदारी वृत्तपत्रंच सर्वांत जास्त कम्युनिझमचा प्रचार करतात ! " तोंच एका धष्टपुष्ट, सांवळया वर्णाच्या इसमानें मजपाशीं येऊन विचारलें, "का हो, शांघायनंतर हे लाल सैन्य कुठें निघालंय ? हा पेपर काय म्हणतोय् ?– "

मी जोरांत म्हटलें: " कां ? तूं कुणी लालबावटेवाला दिसतोयस ? "

तो उत्तरला—" मी मजूर आहे. " मी विचारलं " तूं हिंदुस्थानांत राहतोस मग चीनच्या लाल फौजेशीं तुझा काय संबंध ? "

तो म्हणाला " मी यासाठीं विचारतों, कारण मी मजूर आहे. "

मी गंभीरपणें म्हणालों—" तर ऐक. शांघायनंतर लाल सेना फुचौला पोंचली आहे " नि मग त्याच्या हातावर टाळी देत म्हणालों, 'चंगळ आहे !'

" याचा अर्थ काय ? " — त्यानें विचारलें.

" बाबा, अर्थ कांहीं नाहीं. इतकाच कीं, मी फार खूष आहे आज. "

तो म्हणाला, " हा कसला आडमार्ग ? मी खुषींत आलों कीं सरळ ओरडतों—'लाल बावटे की जय !' "

मी हंसलों व तोही मग माझ्या खांद्यावर जोरानें हात मारीत म्हणाला, " बिडी तरी पाजा. "

सिगारेटची राख झाडीत मी त्याला एक सिगारेट दिली. त्याला फार आनंद झाला. तो म्हणाला, " तुम्ही फार सज्जन दिसतां. तुमच्याशीं आपलं छान जमेल. सांगा, या मुंबईत काय करतां ? — "

मी म्हटलं, " मी आहे लेखक. "

" तर मग तुमची स्थिति फार वाईट असेल ? "

" ती कशी काय ? "

" कारण भाकर पुरेशी मिळत नाहीं तोंवर पुस्तकं कोण वाचणार ? तुम्ही कुठें मजूरी कां नाहीं करीत ? "

" ही पण मजूरीच आहे. "

" मजूरीचा माझा अर्थ असा कीं, मी मॅट्रिक पास असून बॉंबे सेंट्रलवर हमाली करतों, बोजे उचलतों, मेहनत करतों व दुसऱ्या कामगारांत जागृति करतों. हे माझ्या हातावरचे घट्टे पाहिलेत ? – पोटरीवरचे व्रण दिसतात हे..." पायजमा वर करीत व ते व्रण दाखवीत तो म्हणाला, " ट्रेड युनिअनच्या लढाईतले हे घाव ! "

मी म्हटलं, " हो , फार मजबूत दिसतोस ! "

तो म्हणाला " आता तर कांहींच नाहीं. पूर्वी फार तगडा होतों. ठोकरा खात खात आंतून पार पोंखरून गेलोंय्. डॉक्टर म्हणतोय्: 'दूध प्या व बदाम खा, सहा महिने पर्यंत.' आतां त्या बेट्याला कोणी सांगावं कीं, हा भांडवलदारांचा समाज आहे. यांत दूध नि बदाम धनिकांच्या वांट्यालाच येतात. आमच्या कपाळीं तर उपासमार आहे, बेकारी आहे नि अज्ञानांत राहायचं आहे ! अन् डोक्यावर राष्ट्रीय सरकार आहे. "

मी म्हटलं, " आपल्या सरकारविरुद्ध मी एक शब्दही ऐकूं नाहीं इच्छीत:" तो उद्गारला. " जुजुत्सुचा असा एक फटका देईन कीं सारी गुर्मी जिरेल ! "

" तूं जुजुत्सू जाणतोस ?– "

" हो. मी पूर्वी फौजेंत होतों शिपाई. मलाया-ब्रमांत












फॅसिस्टांविरुद्ध लढलोंय. पण युद्ध संपलं व मी बेकार झालों. म्हणून माझ्या मतें अजून युद्ध संपलेलें नाहीं. मी अजून फॅसिस्टांविरुद्ध लढतों आहें. त्यासाठीं जुजुत्सू जाणणं जरूरीचं आहे. "

त्यानें वळून माझ्याकडे पाहिले. मी त्वरित तोंड फिरवून बसलों तोंच गाडीही निघाली. नाहींतर जुजुत्सूचा त्याचा डाव मला कोणत्या पथावर नेता... !

चर्चगेटला पोंचताच मी हॉर्नबी रोडवरील दुकानांच्या सजवलेल्या कांचेच्या शो-केसेसकडे पहात निघालों. मी आज खूप श्रीमंत होतों. चार रुपये नी कांहीं पैसे खिशांत होते. अन् दुकानं सुंदर वस्तूंनीं नटलीं होतीं. ' आज तर आपण सारी मुंबई विकत घेवूं ! ' – मनांत विचार चमकून गेला.

हें एक घड्याळाचं दुकान आहे. इथं एक सिन्धी निर्वासिताचं दुकान आहे कापडाचं. परदेशी रेशमी शर्ट्स् बिलोरी कांचांच्या आलमाऱ्यांतून झगमगत होते. किंमती होत्या रु. २२...१८...१६... बाराच्याखालीं एकही नव्हता. मी आज धनवान् असूनहि एखादा शर्ट खरीदूं शकत नव्हतों.

पुढें व्हाइट वे लेड्लॉच्या कांचेरी भींतींतून नाजुक स्त्रिया तलम उंची फ्रॉक घातलेल्या दिसत होत्या. आजकाल धनिकललनाही जीवनाकडून मृत्यूकडे निघाल्या आहेत. पुतळयागत त्यांच्यांत कृत्रिमता आहे. शृंगार असतो तेव्हां कोणतीच हरकत नसते. हरकत नसते तिथें जीवन नसतें. जेव्हां जीवन नसतें तेव्हां दुर्गंधि येते, जी इव्हीनिंग-इन-पॅरिसही छपवूं शकत नाहीं. जिथें पॅरिस छपवूं शकत नाहीं, तर इथें काय चालणार ?–जिथें परकीय साम्राज्याबरोबरच स्वराज्याचं प्रेतही सडत पडलं आहे !

शोभिवंत दुकानांतून रेशमी वस्त्रं होतीं. शर्ट्स् पाटलोणी, घड्याळं, बूट्स, पेन्स, ब्लेड्स्, चिनी प्लेट्स्, बरसाती रेनकोट, गालीचे व गुलदान होते. पुष्पपात्रें होतीं पण फुलं नव्हतीं. नांगर नव्हते; फावडें ट्रॅक्टर, क्रॉसबार, रॅंच वा स्पिंडल नव्हते. हॉर्नबी-रोडवर धान्य नाहीं मिळत, फुलं मिळत नाहींत, मुलांचीं पुस्तकं मिळत नाहींत, कामाचीं यंत्रें मिळत नाहींत. कोणतीच कामाची वस्तु नाहीं मिळत इथं !

मी ४ रुपये घेऊन आलों होतों. पण येथें सर्व उंची डाग होते. जितके उंची डाग तितकें उंची दाम नी तितकेंच उंची काम आणि तितकीच भयानक गरिबी. गरिबीचा विचार येतांच आठवलं कीं सकाळपासून नुसताच भटकतोंय. कांहीं खाल्लं देखील नाहीं. मग एका मद्रासी हॉटेलांत गेलों. इथें चांगले नि स्वस्त पदार्थ मिळतात. ९ आण्यांत दहीवडे, मसाला-डोसा व म्हैसूरपाक खाऊन वर एक गोडसें मद्रासी पान चघळायला मिळालं. तें खात मी संतोषाचा–तृप्तीचा ढेकर दिला. मग हॉर्नबी रोडवरून हिंडत बोरीबंदरकडे निघालों. बोरीबंदर हें मुंबईतलं एक छानसं स्थळ आहे. याच्या एका बाजूस सिनेमा-हॉल आहे, दुसरीकडे स्टेशन आहे व तिसरीकडे लष्करी कोर्ट आहे. मध्यभागीं पुढाऱ्यांचे पुतळे आहेत. चित्रगृहामागें मोठं मैदान आहे, जिथें इंग्रजी राज्यांत पोलिसपरेड चाले. अलीकडे इथें खादीचं प्रदर्शन असतं.

... खाणं आटोपलं कीं मी विसावा घेतों. म्हणून मी या पटांगणांत येऊन पडलों. माझ्या डोक्यावर गुल्मोहोराचं एक रोपटं होतं, ज्यांवर तांबडीं फुलं फुललीं होतीं. वृक्षाच्या फांदीवर लाल पंखाच्या कांहीं चिमण्या चिवचिवत होत्या. एक गुर्जर तरुणी गर्द तांबूस फुलांची साडी नेसून चालली होती. सिनेमाच्या भिंतीवर लाल अक्षरांत लिहिलं होतं–"Red Skeleton in Red House ! " या लाल संकटांत झोंपायची माझीच हिम्मत होती ! किती वेळ मी झोंपलों होतों पत्ता नाहीं. पण मग एकदम दचकून उठलों. कुणीतरी माझ्या कमरेंत जोरकस लाथ मारली होती. पाहिलं, तों एक पहारेकरी तिथें उभा. मी त्यास म्हटलें, " काय आहे ? " तो उत्तरला, " इथें तुम्ही झोंपूं नाहीं शकत. ". " कां नाहीं शकत ? " " मी सांगतों... शकत नाहीं." मी त्याच्या हातावर आठ आणे ठेवले व विचारलें, "आता शकतों का ? " त्यानें आधेली खिशांत टाकून उत्तर दिलें, "आता शकतां ! "

" तुझं कितीपर्यंत इथं काम आहे ? "

" अजून दोन घण्टे– "

मी बोललों, " हे बघ, मी २ तास झोंपतों. तूं या झाडाखालीं बसून पहारा कर. नि बघ, दुसरा कुणी पहारेदार न सतावो ! दोन तासांनीं मला उठव. आणखी एक अधेली मी देईन. समजलं ? "

तो म्हणाला, 'हो. ' तो पहारा देत उभा राहिला व










मी झोंपीं गेलों. २ तासांनी त्यानें मला उठवलें व म्हणाला, "चला उठा. माझी ड्यूटी संपली. आतां दुसरा राखणदार येईल."

मी त्याला दुसरी अधेली दिली व म्हणालों, "शाबास, तूं हें फार छान केलंस. मला विश्रांति घेवूं दिलीस. नाहींतर माझं डोकं दुखतं. बरं, तूं आतां इथून घरीं जाणार ?" तो म्हणाला–' अर्थात् ! '

" तुला मुलं किती आहेत ? " –

" दोन. एक मुलगा आहे शाळकरी. एक दोन वर्षांची मुलगी आहे. तिच्यासाठीं मी आतां विलायती दुधाचा डबा घेऊन जाईन."

मी म्हटलं, " तुझ्या पगारांतून गुजराण होत नाहीं तुझी ? "

तो राखणदार बोलला, " गुजराण होती तर मला काय वेड लागलंय इथं तुम्हाला पहारा द्यायला ! " आणि निराश मनानें निघून गेला.

— आणि मी मेट्रो सिनेमाकडे निघालों. इकडे कबुतरखान्यांप्रमाणें निर्वासितांसाठीं लांकडाचीं छोटीं-छोटीं दुकानं लावलीं आहेत. या दुकानांतून बहुतेक पुराणा माल मिळतोः जुने जोडे, जुनीं यंत्रें, जुने कपडे निर्वासितांसारखेच विस्कटलेले, उसवलेले ! दोनतीन सिंध्यांचीं हॉटेलं पण आहेत, ज्यांत चहा, बटाटेकाप, पापड, भजीं मिळतात. मी एका हॉटेलांत आम्लेट खाल्लें. दोन आण्याचे बटाटेकाप घेतले. मग दोन आण्यांचीं भजीं व पापडी घेतली. एक कप चहा घेतला. मैदानांत झोंपल्यानें केंस विस्कटले होते, म्हणून दोन आण्याचा एक कंगवा घेतला. तो डोक्यांतनं फिरवतों तों आवाज आला—

" ये बेटा, खाना खा ! "

मी निरखून पाहिलं. ती एक पंजाबी वृद्धा होती. सफेत केंस, चर्येवर सुरकुत्या– ऊन, पावसाळा, कष्ट व विषादाच्या छटा होत्या. ओढणी मळलेली होती पण मुद्रेवर खेदकारी आकर्षक स्मित होतं. ती इथं एक बारिकसं दुकान लावून बसली होती. एकीकडे तवा ठेवला होता; परात होती, चिमटा होता, चूल होती अन् एका पातेल्यांत कालवण होतें. आटा मळून ठेवलेला होता. चपात्या उतरवून दोन मुशाफिरांना ती वाढीत होती. मी थांबलों. तें बघून तिनं मळकी ओढणी माथ्यावर सरकवली व हंसून म्हणाली : " ये बेटा, खा रोटी. पंजाबी दिसतोस ? "

छपरांत शिरत मी म्हणालों, " माँ, कशाला करतां हें काम ? "

ती बोलली. " नाहींतर काय करूं ? मला तर हेंच काम येतंय. आयुष्यभर घरच्या लोकांसाठीं मी सैंपाकच करीत आलेंय. आतां आपल्या भटकल्या गोरगरीब लोकांसाठीं खाना बनवते आहे. "

ती म्हातारी जालंदरची होती. तिची आपली राम-कहाणी चालली होती. इतक्यांत आणखी एक गिऱ्हाईक आलं व म्हणालं, " अम्मा, चवलीचं कालवण नि दोन चपात्या दे. "

...... मीही कोंपऱ्यांत बसून जेवूं लागलों. सागुतीचं कालवण व गरमागरम चपात्या. मजा आली खूप. मी म्हटलं, " अम्मा इथें एक खानावळ लाव."

ती उत्तरलीः " त्याला फार मेहनत पडते, बेटा. माझ्या हातापायांत तेवढी ताकद आंता उरली नाहीं. " ती मग मुकाट्यानें चुलीवर चपात्या भाजूं लागली. तिच्या सुरकतलेल्या चर्येवर एक विचित्र प्रकारचं स्मित झळकलं. लगेच ती रडूं लागली. तिच्या डोळ्या-वाटें अश्रू गळूं लागले नि तव्यावर पडून सुकूं लागले. आंसवांत भाजलेल्या चपात्या मेट्रो सिनेमासमोर फक्त दोन आण्यांत मिळतात ! मनांत आलं कीं, ' एखादे दिवशीं आशियाचे सर्वश्रेष्ठ पुढारी पंडित नेहरूंना इथें भोजनाचें निमंत्रण द्यावें— ! '

मेट्रो सिनेमाच्या बाहेर असे तळपते चेहरे होते, असे भडक पोषाख होते नि अशा झगमगत्या विद्यु-ल्लता होत्या ! विल्यम पॉवेल अर्धवस्त्रांकित तरुणींनीं घेरला गेला होता. सुंदर वेषभूषेंतील महिलांना रंगीत मोटारींतून पुरुष मोठ्या अदबीनें उतरवून घेत होते. नजरेंत ती भूक होती, ती घमेंड होती, ती क्रूरता होती जी जणूं आक्रोशून सांगत होती कीं, " या भिंती-वरील स्त्रिया जर जिवंत होऊन इथें फ्रेम्समधून खालीं उतरल्या तर हे पुरुष मेट्रोसमोर, साऱ्या लोकांसमक्ष त्यांची लाज घेतील ". अन् ही एंटरटेन्मेंट हिंदी चित्रपटांतूनही घुसली आहे—डॉलरसारखी.

साम्राज्य-जीवनाच्या अंगप्रत्यंगांत व्यभिचाराचें समर्थन आहे. सत्य, सौंदर्य, शुचिता, शांति, शील, सदन, ग्रंथ, पुष्प, विसांवा या सर्व वस्तूंना साम्राज्यवाद नग्न करून त्यांच्याशीं व्यभिचार करतो आणि मग त्याला





कमीजास्त भावांत बाजारांत विकतो.

वस्तूला शील नाहीं, तिला मोल आहे, जें नित्य चढतं, उतरतं ! कधीं चलनवाढ तर कधीं चलनतूट. अखेर सदा युद्ध आहे. शान्तीशीं एक प्रकारचा व्यभिचारच तो !

—अजून खेळ सुरूं व्हायला दीड तास होता. परंतु साडेदहा आण्याच्या तिकिटासाठीं लांब 'क्यू' लागलेला होता. मी पण त्यांत जाऊन उभा राहिलों. माझ्यामागेंच एक दुबळी, सडपातळ, काळी मुलगी उभी राहिली. फूलदार छिटाचा तंग फ्रॉक ती ल्याली होती. तो फ्रॉक वरती तंग अन् खाली घेरेदार होता. तिनें मध्यभागीं एक पट्टा बांधला होता, त्यामुळें तिच्या देहाचे दोन भाग बनले होते. उनाडांनीं याचं नांव 'सौंदर्य' ठेवलं आहे. त्यामुळें चालतांना खालचा भाग खालीं व वरचा भाग वर होतोसें वाटतें. छाती फाजील वर काढलेली असते. तोंडावर तर इतक्या प्रकारची रंगोटी असते... ! याला समाज सुंदरता म्हणतो ! अशापैकींच एक स्त्री होती ती. आमच्या नजरा एकमेकांच्या नजरेस भिडल्या. मग ती हंसली व मलाही हंसावंच लागलं...

हळूंच आही बोलायला सुरवात केली. आमचं बरंच बोलणं चाललं होतं. तों कुणीसं म्हणालं, "पोरगी तरी काय आहे, काळी ढुस्स !" दुसरा त्यावर म्हणाला, "पण पोरगी तर आहे !" – डायना उद्गारली. "Swines !"– आम्ही मग चहाला गेलों. डायना म्हणाली, 'मी एक बटाटेकापाची पुडी घरीं न्यायला घेते.' दोन आणे त्याचे दिले. पुन्हा ती बोलली: मला 'केंसांना लावायला प्रत्येक रंगाची एक क्लीप हवीय.' चार आणे ते दिले. ती परत कांहीं बोलण्यापूर्वींच मी म्हणालों, 'चला लौकर. उशीर झाल्यास मागनं तिकिट नाहीं मिळायचं' तिकिटं घेऊन आम्ही आंत गेलों. सिनेमा चालू असतां तिनं माझ्याशीं अशी सलगी केली जणूं मी तिचा सौदाच करतो आहे. वास्तविक तसं कांहींच नव्हतं. माझ्याकडे बघून ती दोनतनिदां हंसली; दोनतीन वेळां तिनें मला नाजुक चिमटे काढले. पिक्चर सुटल्यावर ती म्हणाली, "कुठें जायचं आपण आतां ?—" मी उत्तरलों: "कुठें नाहीं. दोघेंही आपापल्या घरीं जाऊं." ती उदासपणें मजकडे पाहूं लागली. मी विचारलं, "तुमचं घर कुठें आहे ?" ती म्हणाली: 'कुलाब्यांस'–मी म्हटलं: "चला तुम्हाला क्रॉसिंगवर नेऊन सोडतों."

आम्ही एका विचित्र मनःस्थितींत बसस्टॉपपाशीं आलों, तिथल्या दिव्याच्या खांबाला टेकून उभे राहिलों. पावसाची झिमझिमही तेवढ्यांत सुरूं झाली. अन् मान्सूनचे मोती तिच्या कुरळ्या कुंतलांवरून ठिबकूं लागले, गालांवर ओघळूं लागले. त्यांतच तिचे आंसूहि मिळाले होते कीं काय कोण जाणे ! आता पर्जन्याचा जोर मात्र वाढत होता आणि वरच्या बल्बमधें जमलेले पाणी खालीं निचरत होतें--एकाएकीं मला असं वाटलं कीं—धुआंधार अशा त्या जलधारांनीं तिची कुरूपता पार धुवून काढली आहे ! तिचा कृष्ण कचपाश चमकला. ती माझ्या खांद्याला भिडली होती. तिची उदास चर्या सुंदर दिसत होती, तिच्या ओल्या बटांमधून एक वेगळाच सुगंध दरवळत होता ! मी हलकेंच पुटपुटलों– "गुड् बाय, डायना."

ती बोलली, "तुम्ही मजवर प्रेम नाहीं करणार ?"

मी तिला कांहीं उत्तर दिलं नाहीं पण मनांत म्हटलं, "नाहीं करूं शकणार प्रेम. तूं आतां घरीं जाशील कुलाब्याला, आपल्या आईपाशीं, भावापाशीं ! तुझ्या जीवनांत येणाऱ्या खऱ्या प्रीतीची प्रतीक्षा करशील. ती प्रीति अवश्य येईल. अशी शोधून, परपुरुषासह भटकून ती येणार नाहीं. तें प्रेम, कष्ट व मेहनत करून लाभतें. जिथून तें प्रेम येतं तिथूनच सौंदर्य येतं. अन् मग कुणी श्रमणारा डी सूझा अगर डी सिल्व्हा तुझ्याशीं विवाहबद्ध होईल. नंतर तूं स्वतःचा सुरेखसा संसार थाटशील आणि मग तुझ्या ध्यानीं येईल कीं, प्रेम ममतेसाठीं असतं. ममता यास्तव असते कीं मूल असावं; मूल यासाठीं हवं असतं कीं मानवानं पुढं जावं व जगांत एक नवं सौंदर्य, एक नवीन जीवन निर्माण व्हावं– "

मी तिच्या मस्तकाचं चुंबन घेऊन म्हणालों, "जा आतां, डायना." तिच्या डोळयांत पाणी आलं. मी न सांगितलेलं कांहीं तिला कळलं; कांहीं नाहीं कळलं. पण ती स्त्री असल्यानें बरंचसं समजली. तिनें माझा प्रेमानें हात दाबला. मी म्हटलें, "तुला मूल होईल तेव्हां या रात्रीची स्मृति म्हणून त्याचं नांव ठेव–कृष्णचंद्र." चालतां चालतां ती हंसली व म्हणाली, "छे ! त्याचं नांव तर मी विल्यम पॅवेल ठेवीन. किती देखणा








पुरुष आहे तो. " अन् मग आम्हीं आपापला मार्ग धरला.

अंधेरीला उतरून पायींच निघालों. सर्वत्र सामसूम होती. मंदिरापाशी कोणी आडवून म्हणालं, " असेल तें टाक नाहींतर जीव घेतों— "

" एक सिगारेट व अर्धा आणा मिळून दीड आणा निघेल– " मी म्हणालों.

त्यानें ' खोटं ' म्हणून माझे खिसे तपासले पण कांहींच न मिळाल्यानें म्हणाला, " तो रेनकोट द्या. " मी तो दिला. त्याच्या हातीं एक सुरा दिसला. मी म्हटलं, " हें काम कां करतोस ? " –तो उत्तरला, " नाहीं तर काय करूं ? दगडाच्या खाणींत काम करतो. परंतु त्यांत निभतं कुठें ! तेव्हां असं कधीं काम मिळेल तें पहातों. "

एका बाकावर बसत मी म्हटलं, " पण दुसरा एक रस्ता आहे पहा, तुला पसंत असेल तर ! ज्या खाणींत तूं काम करतोस ती तुझ्या मालकीची झाली तर ! म्हणजे तुम्हा सगळ्या कामगारांची ? "

तो उत्तरला. " मग तर झक्क होईल फार ! "

"तूं कधीं तुझ्या सोबत्यांना असं कांहीं कधीं म्हणालास ? सारीं कामं तुम्हीच तर करता तिथलीं. डायनामाइट उडवतां, फत्तर फोडतां, त्याचे तुकडे लॉरींत भरतां. नि मेहेनतीचं फळ दुसऱ्याला कां देतां ? "

सुरा लपवीत तो म्हणाला, " तुम्ही हें अगदीं नवं सांगताय. माझ्या सोबत्यांना सांगतों–तुम्ही मला उद्यां इथं भेटाल ? "

मी होकार दिला तसं माझ्याकडे आदरानें पहात त्यानें सुरा पाण्यांत फेकला. पाण्यांत हालचाल झाली. जणुं एखादी जुनी वस्तु आंत जाऊन नवी वर यावी ! मग त्यानें माझा पंजा घट्ट दाबला, एक बिडी काढून चेतवली, रेनकोट मला परत केला व तो स्वतः पावसांत भिजत निघून गेला. अन् मीही घराच्या दिशेनं पावलं उचललीं.

---

## देव माझा सेक्रेटरी !

देव माझा सेक्रेटरी
रात्रंदिवस खूप खपे
शेवीं सहीचा मी धनी !
मला नच कांहीं खुपे.
जाणीवेच्या पलीकडे
चाले त्याचा कारभार,
मला नाहीं समजत
कसे येती करभार !
फुटतात नवे नवे
गुण साऱ्या अवयवीं
न कळतां माळी बांधी
कलमें तीं नवीं नवीं !
रोज नवे नवे गुच्छ
शोभतात मेजावरीं
नच कळें कोण अशा
वर्षवीतें प्रेमसरी !
रोज नवीं उपायनें
कोणी तरी धाडीतसे
वैभवांत ठेवण्याचें
मला लागें कोणां पिसें ?
अकारण माया अशीं
दाखवूनि गुपचुप
आपलीच हौस कोण
भागवितें आपोआप ?
धनगर-पोर एक
बसविला सिंहासनीं
वैभवांत लोळतांना
वाटे जरा लाज मनीं !
सोरे लंगोटीचे दोस्त
दुरावतां नाहीं सुख
हेंचि आतां मला सांगें
माझें मन अंतर्मुख !
सिंहासन लाथाडूनि
खेळेन मी त्यांच्या संगें !
–किंवा आतां राजपद
तुला त्यांना देणें लागें !

—जनार्दन देशपांडे








एक जागतिक महत्त्वाची घटना : श्री. व. भ. कर्णिक

# कोरियांतील युद्धविराम

कोरियांतील युद्ध तूत थांबलें खरें, पण तें तात्पुरतें कीं कायमचें या प्रश्नाचा अद्याप निकाल लागावयाचा आहे. शस्त्रसंधीच्या करारांतील कलमांप्रमाणें जी राजकीय परिषद् ( political conference ) भरणार आहे तिच्यामध्यें काय घडतें त्यावर या प्रश्नाचा निकाल अवलंबून आहे. पण त्या परिषदेबद्दलच आतांपासून भांडणें सुरूं झालीं आहेत.

भांडणाचे मुद्दे दोन : एक परिषदेमध्यें भाग कुणी घ्यावा याबद्दल आणि दुसरा परिषदेमध्यें कोणत्या गोष्टींचा विचार व्हावा याबद्दल. युद्ध झालें तें दोन पक्षांमध्यें. एक पक्ष दक्षिण कोरिया, युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका आदीकरून संयुक्त राष्ट्रसंघाच्या सदस्यांचा आणि दुसरा पक्ष उत्तर कोरिया आणि चीन यांचा. तेव्हां युद्ध ज्या दोन पक्षांमध्यें झालें त्यांनीं एकत्र बसून तहाच्या वाटाघाटी कराव्या असेंच कुणीहि सकृत्-दर्शनीं म्हणेल. युनायटेड् स्टेट्स आणि दक्षिण कोरिया यांनीं हाच आग्रह धरला आणि हिंदुस्थान कोरियामध्यें लढलें नाहीं म्हणून हिंदुस्थानच्या सभासदत्वालाहि विरोध केला. हा विरोध करतांना त्या दोन राष्ट्रांना आपल्या नेहमींच्या अनेक मित्रांची गैरमर्जी सहन करावी लागली. पण ती गैरमर्जी पतकरूनहि त्यांनीं आपलें म्हणणें खरें केलें.

तसेंच, अतिपूर्वेकडील साऱ्या प्रश्नांचा विचार करीत न बसतां ज्या कारणासाठीं युद्ध झालें, तेवढ्याच कोरियाच्या प्रश्नाचा राजकीय परिषदेनें विचार करावा, असें अमेरिका व दक्षिण कोरिया यांचे म्हणणें आहे. इतर प्रश्नांचा विचार सुरूं झाला कीं परिषदेंतील चर्चेला अंतच नाहीं आणि कोरियाच्या एकीकरणाचा जो मूळ मुद्दा तो वर्षांनुवर्षे तसाच लोंबकळत पडेल अशी त्यांना धास्ती वाटते. या धास्तींत मुळींच तथ्य नाहीं असें म्हणणें कठीण आहे, कारण शस्त्रसंधीच्या वाटाघाटी पुऱ्या व्हायला दोन वर्षांहून अधिक काळ लागला. शिवाय ९० दिवसांत परिषदेचें काम संपलें पाहिजे हा जो दक्षिण कोरियाचा आग्रह तो देखील अगदींच नजरेआड करून चालणार नाहीं. त्यामुळें परिषदेनें चर्चेसाठीं घ्यावयाचे प्रश्न मर्यादित स्वरूपाचे असावेत ही अमेरिकेची विचारसणी अगदींच आडमुठेपणाची आहे असें म्हणणें धाष्टर्याचें होईल.

या दोन्ही मुद्द्यांच्या बाबतींत चीन आणि उत्तर कोरिया यांचें म्हणणें वेगळें आहे. आणि तोच विचार रशियानेंहि संयुक्त राष्ट्रांच्या बैठकीमध्यें मांडला होता. त्यांचें म्हणणें असें कीं परिषद् गोलमेजपरिषदेच्या स्वरूपाची असावी. म्हणजे तिच्यामध्यें युध्यमान राष्ट्रांच्या बरोबरीनें कांहीं तटस्थ राष्ट्रांचाही समावेश व्हावा. अशा तटस्थ राष्ट्रांमध्यें रशिया, हिंदुस्थान, पाकिस्तान, बर्मा व इंडोनेशिया यांना बोलवावें अशी चीनची सूचना आहे. तसेंच परिषदेनें केवळ कोरियाच्या प्रश्नाचा विचार न करतां पूर्वआशियामध्यें उद्भवलेल्या साऱ्या वादग्रस्त प्रश्नांचा विचार करावा असाहि त्यांचा आग्रह आहे. चीननें आपल्या या सूचना संयुक्त राष्ट्रसंघाकडे पाठविल्या आहेत. त्यांचा विचार होऊन राजकीय परिषदेच्या सभासदत्वाबद्दल आणि कार्यक्षेत्राबद्दल दोन्ही पक्षांमध्यें एकमत होईल त्याचवेळीं ती परिषद् भरूं शकेल. म्हणून परिषदेचें काम प्रत्यक्षपणें केव्हां सुरूं होईल कुणीं सांगावें ?

केवळ तांत्रिक दृष्ट्या विचार केला तर अमेरिकेचें म्हणणें बिनतोड वाटतें. युध्यमान राष्ट्रांमध्यें तह घडवून आणावयाचा तर युद्धामध्यें ज्यांनीं भाग घेतला त्यांनींच एकत्र बसून युद्ध ज्या कारणामुळें घडलें तें कारण दूर करण्याविषयीं विचारविनिमय केला







पाहिजे हें साधारण रीतीनें खरें आहे. पण कोरियांतील युद्ध हें जरा वेगळ्या स्वरूपाचें युद्ध होतें. या युद्धामध्यें एक खेळाडू अखेरपर्यंत पडद्याबाहेर पडला नाहीं. मोठ्या हिकमतीनें तो आपलें युद्ध शेवटपर्यंत दुसऱ्याच्या मार्फतीनें लढत राहिला. कोरियांतील युद्धामध्यें रशियाचा हात नव्हता असें कोण म्हणूं शकेल ? तसेंच रशियाच्या संमतीखेरीज तहाचीं बोलणीं यशस्वी होणें शक्य आहे का ? अमेरिकेला या गोष्टीची कल्पना आहे. म्हणूनच रशियानें परिषदेमध्यें हजर रहावें या गोष्टीला तिनें हरकत घेतली नाहीं. फक्त, चीन व उत्तर कोरिया यांना हवें असेल तर, एवढीच अट घालून ठेवली.

कोरियांतील युद्ध हें खरें पाहिलें तर रशिया आणि अमेरिका यांच्यांमधील युद्ध होतें. युद्धामध्यें भरडले गेले कोरियांतील लोक, पण खरें भांडण होतें तें या दोन बलाढ्य राष्ट्रांमध्यें. आणि दोघांमध्यें भांडण आहे तें केवळ कोरियाबद्दल नाहीं. या भांडणाचे मुद्दे अनेक आहेत आणि त्यांच्यापैकीं निदान कांहीं महत्त्वाच्या मुद्द्यांचा उभयपक्षीं समाधानकारक असा निकाल लागल्याखेरीज हें भांडण मिटणें अगर कमी होणें शक्य नाहीं. म्हणून केवळ तांत्रिक दृष्ट्या विचार करून फक्त कोरियाच्या प्रश्नाचाच विचार झाला पाहिजे असा आग्रह धरणें योग्य वाटत नाहीं. कारण वस्तुस्थिति अशी आहे कीं इतर कांहीं संलग्न प्रश्नांचा विचार झाल्याखेरीज कोरियाच्या प्रश्नांचा निकाल लागणें शक्य नाहीं.

म्हणून कार्यक्षेत्र अगदींच संकुचित केलें तर परिषद् कदाचित् भरणार नाहीं आणि भरली तरी यशस्वी होणार नाहीं. कार्यक्षेत्राचा विस्तार वाढवितांना तें फारच विस्तृत होत नाहीं अशी जरूर काळजी घ्यावी लागेल. तसेंच कम्युनिस्टांच्या वावदूकपणालाही आळा पडेल अशी एखादी योजना आंखावी लागेल. नाहींतर राजकीय परिषदेचें काम वर्षानुवर्षें चालेल आणि त्यांतून कांहींच निष्पन्न होणार नाहीं. या दोन गोष्टी लक्षांत ठेवूनच परिषदेचें कार्यक्षेत्र वाढविण्याविषयीं विचार झाला पाहिजे. व्यवहारांत या गोष्टी साधणें, विशेषतः कम्युनिस्टांशीं वागतांना, फार कठीण आहे हें खरें. पण कठीण गोष्टीहि शक्य करून दाखविणें हेंच तर मुत्सद्देगिरीचें खरें कार्य आहे. वेगवेगळ्या राष्ट्रांतील मुत्सद्द्यांनीं आतां याच गोष्टीकडे लक्ष द्यावयास हवें.

परिषदेचें कार्यक्षेत्र विस्तृत करावयाचें ठरलें कीं तटस्थ राष्ट्रांनीं हजर राहणें अवश्य आहे हें कुणालाही कबूल करावें लागेल. भांडणारांमध्यें समेट घडवून आणावयाचा म्हणजे मध्यस्थी करणारीं कांहीं मंडळी हवीच. जगामध्यें खरेंखुरें तटस्थ राष्ट्र कुणी नाहींच असें कांहींजणांचें म्हणणें आहे. उदाहरणार्थ, दक्षिण कोरियाला हिंदुस्थान तटस्थ आहे असें वाटत नाहीं, त्याला असें वाटतें कीं हिंदुस्थान कम्युनिस्ट गटामध्यें सामील आहे. कांहीं कम्युनिस्ट राष्ट्रांचा समज याच्या बरोबर उलट आहे. पण ही आत्यंतिक भूमिका झाली. रशिया व अमेरिका यांच्यांतील भांडणाचे जे अनेक मुद्दे आहेत त्यांपैकीं कांहीं मुद्द्यांच्या बाबतींत तरी सर्वस्वीं एका अगर दुसऱ्या बाजूला गुंतलेलीं अशीं कांहीं राष्ट्रें आहेत. त्यांचा या परिषदेंत खूप उपयोग होण्यासारखा आहे. अशा राष्ट्रांमध्यें भारताचा अर्थात्‌च अग्रमानानें उल्लेख केला पाहिजे. तसेंच इतर आशियाई प्रश्नांचा विचार होणार असल्याकारणानें पाकिस्तान, बर्मा व इंडोनेशिया यांची उपस्थितीहि परिषदेला साहाय्यकारक होण्यासारखी आहे. पण इंग्लंडसारख्या राष्ट्राचेंहि या परिषदेंत महत्त्वाचें स्थान आहे. कारण परिषदेपुढें येणाऱ्या एका महत्वाच्या प्रश्नाच्या बाबतींत त्याची विचारसरणी अमेरिकन विचारसरणीपेक्षां भिन्न आहे. अशी भिन्न विचारांचीं राष्ट्रें खेळीमेळीनें भांडणें मिटविण्याच्या हेतूनें एकत्र आलीं, तरच जागतिक शांततेला उपकारक असें कांहींतरी परिषदेंतून निष्पन्न होण्याचा संभव आहे. ज्यांनीं आपलीं मतें व धोरणें आगाऊच ठरवून टाकलीं आहेत असे दोन पक्ष परिषदेमध्यें दंड ठोकून उभे राहिले तर रणांगणामध्यें जें घडलें त्याचीच पुनरावृत्ति तिथेंही घडून येईल.

म्हणून राजकीय परिषद् यशस्वी करावयाची व कोरियांतील युद्ध कायमचें थांबवायचें तर अमेरिकेला आणि संयुक्त राष्ट्रसंघाला परिषदेच्या सभासदत्वाबद्दल आणि कार्यक्षेत्राबद्दल फेरविचार करावयास हवा. चीनच्या विनंतीमुळें हा फेरविचार करण्याची संधि अनायसा चालून आली आहे. फेरविचार करण्यामध्यें कमीपणा नाहीं. उलट, कम्युनिस्टांसारख्या वागायला अत्यंत कठिण अशा प्रतिपक्षाशीं सौजन्यानें वागल्यासारखें



अनुक्रमणिका






होईल. या सौजन्याचें आज ना उद्यां फळ मिळाल्यावांचून राहणार नाहीं. पण एवढा दूरदर्शीपणा आणि दृष्टि अमेरिकन पुढारी दाखवूं शकतील कीं नाहीं हा मोठाच प्रश्न आहे. म्हणून आजतरी तह घडवून आणणाऱ्या राजकीय परिषदेचें भवितव्य संशयांत पडलें आहे, असेंच म्हणावयास पाहिजे.

अखेर कोरियाचें कांहींही होवो, आज तरी निदान त्या देशाला बेचिराग करणारी लढाई बंद पडली ही आनंदाची गोष्ट होय. लढाईनें अखेरीस काय साधलें हा प्रश्न यावेळीं प्रत्येकाच्या मनांत उद्भवणें साहजिक आहे. लढाईनें कोरियाचें एकीकरण साधलें नाहीं, हें तर उघडच आहे. कारण आज देखील कोरियाचे दक्षिण आणि उत्तर कोरिया असे दोन भाग पडलेले आहेत. राजकीय परिषदेमध्यें ते दोन भाग एकत्र सांधण्याची एखादी उभयपक्षांना मान्य अशी योजना निघेल अशी आशा बाळगणेंहि फार कठीण आहे. लढाईमुळें कोरियाचें अपरंपार नुकसान झालें याबद्दल तर शंकाच नाहीं. हें नुकसान भरून काढण्यासाठीं, दुसऱ्या राष्ट्रांनीं मुक्त हस्तानें मदत केली तरी देखील, कोरियन जनतेला पिढ्यान् पिढ्या खपावें लागेल. शिवाय प्राणहानि झाली ती भरून निघणेंच शक्य नाहीं. खेरीज या युद्धांत शत्रूचा अखेर पुरा निःपात झाला हें देखील समाधान नाहीं. अर्थात् यावरून संयुक्त राष्ट्रांच्या म्हणजेच अमेरिकेच्या सेना निष्प्रभ ठरल्या असें अनुमान काढणें मात्र योग्य ठरणार नाहीं. कारण एकतर त्या सेनांना आपल्या देशापासून हजारों मैल दूर अशा ठिकाणीं लढावें लागत होतें आणि दुसरें म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दडपणामुळें जवळ जवळ एक हात बांधून लढावें लागत होतें. युद्धाचा विस्तार होऊं नये म्हणून रसद कुठून येते हें माहीत असूनहि कोरियाच्या हद्दीबाहेर जाऊन ती रसद तोडतां येत नव्हती. या व इतर अनेक कारणांमुळें लढाईचा परिणामकारक असा निकाल लागला नाहीं आणि शेवटचीं दोन वर्षें लढाई जवळ जवळ कुजत होती. म्हणून लढाई बंद पडली त्यावेळीं प्रत्येकाला आनंद झाला. पण विजयाचें समाधान जाणवलें नाहीं. आणि तरी देखील ही लढाई व्यर्थ होती अगर ठरली असें कुणालाहि म्हणतां येणार नाहीं. कारण या लढाईमुळें एक गोष्ट निश्चितपणें घडली आणि ती म्हणजे रशियाच्या आक्रमणाला आळा पडला. कोरियामुळें रशियाला निश्चितपणें कळून चुकलें कीं आतां यापुढें पाऊल टाकावयाचें म्हणजे तिसऱ्या महायुद्धाची तयारी ठेवावयास हवी. कोरियांतील युद्ध सुरूं होईपर्यंत रशियाचें पाऊल सारखें पुढें पडत होतें, या नाहीं त्या मार्गानें देशामागून देश रशियन भोंवऱ्यामध्यें खेचले जात होते. कोरियामध्यें पहिल्याप्रथम त्या प्रवृत्तीला पायबंद पडला, लष्करी सामर्थ्याची तोड मिळाली आणि रशियाला माघार घ्यावी लागली. कोरियामधील आक्रमण यशस्वी झालें असतें तर आणखी किती राष्ट्रें आक्रमणाला बळी पडलीं असतीं तें सांगता येणें कठीण आहे. अतिपूर्व व मध्यपूर्वेतील कांहीं राष्ट्रांचें, तुटपुंजें व अर्धवट स्वरूपाचें का होईना स्वातंत्र्य अद्यापपावेतों जें अबाधित आहे त्याचें बरेंचसें श्रेय कोरियांतील या लढाईला द्यायला हवें.

कोरियांतील लढाईचें हें मूल्यमापन सर्वांनाच मान्य होईल असें नाहीं. कम्युनिस्ट विचारसरणीची जी मंडळी आहेत त्यांना तर तें अमेरिकन साम्राज्यशाहीचें आक्रमक युद्ध होतें असें वाटतें. त्यांचें तर म्हणणें असें कीं उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर आक्रमण केलें हा इतिहासच मुळीं खोटा आणि खरोखरच कुणी आक्रमण केलें असेल तर तें दक्षिण कोरियानें उत्तर कोरियावर. इतर कांहींचें म्हणणें असें कीं दक्षिण व उत्तर कोरिया यांच्यामधील हें गृहयुद्ध होतें, त्यांच्यामध्यें इतर राष्ट्रांनीं पडावयास नको होतें. या विचारसरणीच्या मार्गांतील मोठी अडचण ही आहे कीं उत्तर कोरिया व दक्षिण कोरिया हीं दोन वेगळीं स्वतंत्र राष्ट्रें होतीं आणि एकाच देशाचे ते दोन दुभंगलेले तुकडे असले तरी आंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणें उत्तरेनें दक्षिणेवर स्वारी करणें दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करण्यासारखें होतें व आक्रमणाची प्रवृत्ति रोखावयाची तर आक्रमकाविरुद्ध संयुक्त राष्ट्रांनीं हत्यार उगारणें आवश्यक होतें. कांहींचें म्हणणें असें कीं युद्ध पुकारण्याच्या बाबतींत संयुक्त राष्ट्रसंघटनेनें घाई केली, युद्ध पुकारण्यापूर्वीं तिनें उत्तर कोरियाला आपली बाजू पुढें मांडण्याची संधि द्यायला हवी होती. पण अडचण ही आहे कीं तशी संधि दिली असती तर चारदोन दिवसांतच दक्षिण कोरियाचा फडशा उडाला असता आणि तक्रार करायला आणि संरक्षण मागायला तें राष्ट्रच मुळीं जिवंत राहिलें नसतें. शेवटची एक विचारसरणी अशी










कीं डावपेंचाच्या दृष्टीनें अमेरिकेनें व संयुक्त राष्ट्रांनीं या युद्धांत गुंतून पडणें इष्ट नव्हतें. हें युद्ध अमेरिकेला व संयुक्त राष्ट्रांना जिंकणें शक्य नव्हतें व निष्कारण या युद्धामध्यें अमेरिका व इतर पाश्चात्त्य राष्ट्रें यांच्या शक्तीचा अपव्यय झाला. या बाबतींत विचार करण्यासारखा मुद्दा हा कीं आंतरराष्ट्रीय राजकारणांत असें हिशोबी धोरण ठेवून भागत नाहीं. एकदा आक्रमण रोखायचें असें ठरलें कीं तें जिथें प्रगट होईल तिथें रोखायला पाहिजे. सुरवातीलाच तें रोखलें नाहीं तर ती प्रवृत्ति बळावते आणि हिट्लरच्या बाबतींत घडली तशी आक्रमणांची परंपरा सुरू होते. शिवाय कोरियाच्या बाबतींत पड खाल्ली तर पुढचें आक्रमण जास्त सुलभतेनें रोखतां येईल अशी तरी खात्री कोण देऊं शकलें असतें? कोरियानंतरचा हल्ला संरक्षणाला जास्त कठीण अशा एखाद्या ठिकाणींहि पडला असता. म्हणून डावपेंचाच्या दृष्टीनें जो युक्तिवाद लढवला जातो त्यामध्यें विशेष तथ्य आहे असें वाटत नाहीं. अर्थात् युद्ध लढवतांना चुका घडल्या नाहींत अगर चुकीचीं धोरणें स्वीकारलीं गेलीं नाहींत असें कुणालाहि म्हणावयाचें नाहीं. विशेषेंकरून दक्षिण कोरियाच्या सीमारेषेपलीकडे जाणें अत्यंत चुकीचें होतें. दक्षिण कोरियावर आक्रमण झालें म्हणून युद्ध सुरू झालें, आक्रमणाचें निराकरण होतांच युद्ध थांबायला हवें होतें आणि राजनैतिक स्वरूपाचीं बोलणीं सुरू व्हायला हवीं होतीं. त्यानंतर विजयाच्या नशेंत जनरल मॅकऑर्थरनें चीनच्या सरहद्दीपर्यंत जी चाल केली ती देखील एक मोठी चूक झाली. अशा तऱ्हेच्या कांहीं चुकांमुळें युद्ध निष्कारण लांबलें आणि जगाला आणि कोरियाला युद्धाच्या यातना जास्त दिवस सहन कराव्या लागल्या.

रशिया आणि अमेरिका या दोन प्रचंड राष्ट्रांमधील भांडणामुळें व सत्तास्पर्धेमुळें कोरियामध्यें हा युद्धाचा वणवा पेटला होता. हीं भांडणें आणि सत्तास्पर्धा जोंवर कायम आहे तोंवर कोणत्या राष्ट्रावर हें संकट केव्हां कोसळेल तें सांगणें मोठें कठीण आहे. कोणच्याहि राष्ट्राचा केव्हांही कोरिया होऊं शकेल. आणि जग जसें या दोन राष्ट्रांभोंवतीं तयार झालेल्या दोन परस्परविरोधी गटांमध्यें विभागलें जात आहे तसतसें लहान व दुबळ्या राष्ट्रांवरील हें संकट वाढत चाललें आहे. म्हणून संरक्षणासाठीं या नाहीं त्या गटांत सामील होणें हा हें संकट टाळण्याचा मार्ग नव्हे. त्यासाठीं भारतानें स्वीकारलें आहे तसें स्वतंत्रपणाचें, दोन्ही गटांपासून अलिप्त राहण्याचें धोरण स्वीकारणेंच जरूर आहे. अशी स्वतंत्र वृत्तीचीं राष्ट्रें वाढूं लागलीं तर त्यांचें दडपण दोघांवरहि पडेल आणि शांततेला धोका पोंचेल असें कोणतेंहि कृत्य करण्यापासून दोन्हीं राष्ट्रें परावृत्त होतील. पण स्वतंत्र वृत्ति स्वीकारणें याचा अर्थ असा नव्हे कीं जागतिक शांततेचा भंग एखाद्या राष्ट्रानें केला तरी त्याबद्दल मूग गिळून स्वस्थ बसणें. कोरियाच्या बाबतींत उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर आक्रमण केलें म्हणून भारतानेंहि त्या कृत्याचा निषेध केला. मागाहून इतर अनेक कारणांमुळें त्याला युद्धामध्यें भाग घेता आला नाहीं हें वेगळें. पण आक्रमण कुणीं कुणावर केलें याबद्दल भारताच्या मनांत केव्हांही शंका नव्हती. आक्रमणाच्या निषेधाबद्दलची स्वतंत्र प्रवृत्तीच्या राष्ट्रांची ही खंबीर वृत्ति राहिली तर रशियालाहि यापुढें आक्रमणाचा मनसुबा रचण्यापूर्वी एकदा सोडून शंभर वेळां विचार करावा लागेल.

कोरियांतील युद्धविरामामुळें भारताच्या शिरावर एक नवी जबाबदारी येऊन पडली आहे. ती म्हणजे स्वदेशी परत जायला तयार नसणाऱ्या युद्धकैद्यांची त्यांच्याबाबतचा अखेर निकाल लागेपर्यंत व्यवस्था पाहणें. हें काम करण्यासाठीं हिंदी सैन्याची ५००० ची एक तुकडी आता कोरियामध्यें जाऊन दाखल झाली असून सप्टेम्बरच्या दुसऱ्या आठवड्यापासून तिच्या कामाला सुरवात झाली आहे. या कामाबद्दलचे जे वृत्तांत आतांपर्यंत आले आहेत ते अत्यंत गौरवास्पद असे आहेत. स्वदेशीं परत जाऊं न इच्छिणाऱ्या युद्धकैद्यांचा प्रश्न एके काळीं अत्यंत कठीण होऊन बसला होता. शस्त्रसंधीच्या वाटाघाटी त्या प्रश्नामुळेंच कित्येक महिने अडून राहिल्या होत्या. अखेर भारतानें एक तडजोड सुचवली. संयुक्त राष्ट्रांनीं ती मान्य केली. सुरवातीला रशियानें व चीननें ती नाकारली, पण कांहीं महिन्यांनंतर जवळजवळ त्याच स्वरूपाच्या अटींवर शस्त्रसंधि करण्याची तयारी दाखवली. या पूर्वेतिहासामुळें शस्त्रसंधि होतांच उरलेल्या युद्धकैद्यांची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी भारताकडे येणें क्रमप्राप्तच होतें. मध्यंतरीं आपल्या देखरेखीखालील बीसबावीस हजार, स्वदेशीं परत जायला तयार नसणाऱ्या, युद्धकैद्यांना












कुणालाही न विचारता मोकळें करून दक्षिण कोरियाचे राष्ट्रपती जे सिंगमन ऱ्ही यांनीं एक मोठाच पेंचप्रसंग निर्माण केला होता. पण सुदैवानें चीन आणि उत्तर कोरिया यांनीं त्या बाबतींत विशेष कोलाहल केला नाहीं. त्यामुळें त्या अडचणीमुळें वाटाघाटी मोडतात कीं काय अशी जी धास्ती वाटत होती ती खोटी ठरली. ऱ्ही यांच्या या कृत्यामुळें परत जाऊं न इच्छिणाऱ्या युद्धकैद्यांची संख्या निम्म्यानें कमी झाली आणि त्या मानानें भारतावरील जबाबदारीही कमी झाली आहे. युद्धकैद्यांना त्यांच्या इच्छेविरुद्ध स्वदेशी जायला भाग पाडणें केव्हांही योग्य ठरलें नसतें. अमेरिकेनें या बाबतींत जो आग्रह धरला तो न्याय्य स्वरूपाचा होता. अखेर सर्वांना त्या आग्रहाला मान्यता द्यावी लागली. स्वदेशीं परत जाण्याची सक्ती कुणाहि युद्धकैद्यावर यापुढें केली जाणार नाहीं. पहावयास पाहिजे म्हणजे एवढेंच कीं स्वदेशीं परत न जाण्याचा हा निश्चय युद्धकैद्यानें समजून उमजून आणि राजीखुषीनें केलेला आहे. कोरियन युद्धांतील युद्धकैद्यांच्या बाबतींतील ही पहाणी आतां सुरू होणार आहे. पहाणी चालूं असतांना ते एखाद्या तटस्थ राष्ट्राच्या देखरेखीखालीं असावे असें ठरलें म्हणूनच भारताला युद्धकैद्यांच्या रखवालीचें हें काम पतकरावें लागलें. भारत हें काम सहानुभूतीनें, समजूतदारपणानें आणि निःपक्षपातबुद्धीनें करील व त्याच्या योगानें भारताचा जगांतील दर्जा जास्त वाढेल याबद्दल कुणालाहि संशय वाटत नाहीं.

युद्ध बंद झालें न झालें तोंच कांहीं मंडळी युद्धाची भाषा पुन्हा बोलूं लागलीं ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. या बाबतींत अत्यंत दोषी कोण असले तर तो डॉ. सिंगमन ऱ्ही. या गृहस्थांना आतां वीरश्री उसळली असून सैन्याच्या बळावर कोरियाचें एकीकरण करण्याची भाषा आतां ते बोलूं लागले आहेत. कोरियाचें एकीकरण हें संयुक्त राष्ट्रांचें सर्वमान्य असें उद्दिष्ट आहे, पण तें घडवून आणण्यासाठीं जरूर तर युद्ध देखील पुकारावयाचें अशी भूमिका संयुक्तराष्ट्रांनीं कधींच स्वीकारलेली नाहीं. हीं गोष्ट अमेरिकेनें डॉ. ऱ्ही यास तावडतोब पटवून दिली पाहिजे. आपलेंच बाळ आपल्यावर उलटणार नाहीं, अशी खबरदारी अमेरिकेनें आतांपासूनच घ्यावयास हवी. डॉ. ऱ्ही यांच्या उपद्व्यापामुळें शांतताभंग झाला आणि युद्धाला सुरवात झाली आणि अमेरिका त्यांचा पाठपुरावा करूं लागली तर तिच्या मदतीला कुणीही उभें राहणार नाहीं ही गोष्ट अमेरिकेनें विसरू नये. तसेंच कम्युनिस्टांनीं जर पुन्हा शांतताभंग केला तर जागतिक लोकमत त्यांच्या विरुद्धहि खवळल्यावांचून राहणार नाहीं. कोरियाच्या एकीकरणाच्या बाबतींतहि ते सारखे खोडाच घालीत राहिले तरीहि लोकमत त्यांच्या विरुद्ध प्रक्षुब्ध होईल. म्हणून दोन्ही पक्षांनीं आतां समजूतदारपणाणानें वागण्याची वेळ येऊन ठेपली आहे. हा समजूतदारपणा दृष्टीस पडला तर राजकीय परिषदेच्या मार्गातील सारीं विघ्नें दूर होतील आणि ती परिषद् यशस्वी होऊन शस्त्रसंधीचें तहामध्यें रूपांतर होईल. सर्व देशांतील जनता मोठ्या आशाळभूतपणानें त्या घटनेची वाट पहात आहे. पण ती घटना घडून येईल का ?

## तूं वनमाळी— !

निळया धुक्यांतून भल्या सकाळीं
तव तनुरेखा सख्या उमलली !
हरित तृणाचें सकंप पातें
तुझ्या यशाचीं गीतें गातें
ग्रहगोलांची अबोल माला
तुझ्याच रुळते सखया भाळीं
गंधित, चंचल वीचि वायुच्या
मुखरित ज्यांतुन तुझीच वाचा
तुझींच रे हीं निःश्वसितें जीं
अमरपणाच्या दंवांत न्हालीं.

तुझें सांवळें रूप मनोहर
हंसऱ्या, फेनिल जललहरींवर
गगनमंदिरीं रुळे लाजरी
मेघबटा रे तुझीच कुरळी.
रंग, रूप, रस, गंध व्यापुनी
रे जीवनघन नटविसि अवनी
चराचरांतुन चैतन्याचा
मळा फुलविशी तूं वनमाळीं

—मधुकर बावगांवकर




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

एक परिसंवाद

# आपल्यामधील वर्तमान असंतोष आणि वैफल्य

[ कांहीं दिवसांपूर्वी मुंबई येथील इंडियन सोशॉलॉजिकल सोसायटीच्या वतीनें ' आपल्यामधील वर्तमान असंतोष आणि वैफल्य ' या विषयावर इंग्रजींतून एक उद्बोधक चर्चा झाली. त्या चर्चेचा वृत्तान्त सोशॉलॉजिकल बुलेटिन ( मुंबई ) च्या सप्टेंबर १९५३ च्या अंकांत आला आहे. त्यावरून त्या चर्चेचा प्रा. गोवर्धन पारीख यांनीं काढलेला गोषवारा पुढें दिला आहे. निरनिराळ्या दृष्टिकोणांतून प्रस्तुत चर्चेत झालेलें आपल्या असंतोष-वैफल्याचें निदान वाचकांस विचारप्रवर्तक वाटेल. या चर्चेच्या वेळीं **प्रा. गो. स. घुर्ये** हे अध्यक्ष होते. ते आपल्या अध्यक्षीय समारोपांत म्हणाले : " ही चर्चा सर्वस्वीं प्रातिनिधिक स्वरूपाची नसली तरी अत्यंत महत्त्वाची व उपयुक्त ठरेल अशी झाली आहे. समाजांतील कांहीं महत्त्वाचे दृष्टिकोण आज येथें मांडले गेले नसले तरीदेखील ' असंतोष व वैफल्य ' या अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नाच्या व्यापक स्वरूपाचें प्रथमदर्शन या चर्चेंतून होऊं शकेल असें वाटतें. या प्रश्नाचा अजून कितीतरी मोठ्या प्रमाणांत ऊहापोह होण्याची व तत्संबंधीं संशोधन करण्याची गरज आहे. त्यायोगानें महत्त्वाचे निष्कर्ष काढतां येतील आणि योग्य उपाययोजनाहि सुचविणें शक्य होईल. आजच्या चर्चेनें या कार्यास उपयुक्त असा आरंभ होत आहे. " ]

## सुबुद्ध नागरिकाचा दृष्टिकोण ( आर्. एस्. भट्ट )

आम्ही चटकन् संतुष्ट वा असंतुष्ट होणारे लोक आहोंत असा एक समज आहे. तथापि तो क्षणभर बाजूस ठेवून जनतेंत आढळणाऱ्या विषण्ण मनःस्थितीचा विचार करणें जरूर आहे. मी केवळ युद्धोत्तर काळचाच विचार करणार आहे. स्वातंत्र्य-प्राप्तीमुळें गुलामगिरींतील अनेक अनिष्ट बंधनें नाहींशीं झालीं आणि अनेक वर्षांपासून हवी असलेली निरनिराळ्या क्षेत्रांत मोकळेपणानें वागण्याची संधि आम्हांस मिळाली. यामुळें सामान्य जनतेंत रचनात्मक कार्याविषयीं उत्साह व सामर्थ्य प्रत्ययास येतील अशी अपेक्षा निर्माण झाली. तथापि आज पांच वर्षांनंतर सगळीकडे—आणि विशेषतः बुद्धिजीवी वर्गांत औदासीन्य, निराशा आणि वैफल्य दिसत आहे. हें निरोगीपणाचें चिन्ह खास नव्हे, आजारी वा कुजत असलेल्या समाजाचीं हीं सामान्य लक्षणें होत. म्हणून त्यासंबंधीचें योग्य निदान व उपाययोजना होणें आवश्यक आहे.

या असंतोषाचीं कारणें अनेक आहेत. त्यांपैकीं कांहीं ठळक कारणांचाच मी उल्लेख करणार आहे. त्यांतील कांहीं व्यापक अर्थानें असंतोषास जबाबदार आहेत, उलट दुसरीं कांहीं मर्यादित क्षेत्रांतच लागू पडण्यासारखीं आहेत. पहिल्या प्रकारचीं तीन महत्त्वाचीं कारणें सांगतां येतील. पहिलें असें कीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर रहाणीच्या मानांत सर्वांगीण सुधारणा होईल अशी अपेक्षा होती. विशेषतः युद्धकालीन पार्श्वभूमीचा विचार करतां अन्न, वस्त्र, आसरा इत्यादि गरजांच्या बाबतींत सुधारणा होणें आवश्यक होतें. ही अपेक्षा अर्धवट पुरी झाली आहे. जीवनाच्या अगदीं किमान गरजा देखील पुऱ्या होत नसल्याकारणानें सामान्य जनतेंत असंतोष निर्माण होणें आणि राज्यकर्त्यांना दोष देण्याची प्रवृत्ति बळावणें स्वाभाविक आहे. दुसरें म्हणजे आपले पुढारीच राज्यकारभार करीत असल्यामुळें अधिकारी








आणि जनता यांच्यांतील संबंध सुधारतील अशी अपेक्षा होती. तथापि याहि बाबतींत विशेष फरक घडून आलेला नाहीं. शासनसत्तेची कार्यक्षमता कमी आणि तिच्या द्वारा जनतेच्या होणाऱ्या कामांत दिरंगाई व चुकारपणा दिसूं लागला. प्रसंगविशेषीं त्यासाठीं पैसा व नैतिक किंमत देणेंही आवश्यक होऊं लागलें. आणि तिसरें कारण म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या या पांच वर्षांच्या काळांत प्रत्ययास आलेला, सर्वांना कार्यप्रवण करील अशा ध्येयाचा व कार्यक्रमाचा अभाव हें होय.

आतां मर्यादित क्षेत्रांत परंतु तीव्र स्वरूपाचा असंतोष निर्माण करणारीं चार महत्त्वाचीं कारणें नमूद करतों :

(१) पंजाब, सिंध, बंगाल या प्रांतांतील लाखों लोक सर्वस्वास मुकले आणि असह्य यातना भोगीत त्यांना निर्वासित म्हणून अन्यत्र जावें लागलें. त्यांना पुनः प्रतिष्ठापित करण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले आहेत. त्यांच्या मनांत तीव्र असंतोष व कटुता असणें स्वाभाविकच होतें. हे निर्वासित देशांत अनेक ठिकाणीं पसरल्याकारणानें त्या त्या ठिकाणीं त्यांच्यांतील असंतोष सभोंवतालच्या वातावरणांतहि पसरला आहे.

(२) लोकशाहींत वरिष्ठवर्गांच्या हितसंबंधांवर थोडेंबहुत आक्रमण होणें अपरिहार्यच असतें. अशा तऱ्हेचें आक्रमण त्वरेनें होणें राजकीय दृष्ट्या आवश्यक झालें. त्यामुळें राजेरजवाडे, जमीनदार आणि मोठमोठे उद्योगपती यांच्या हितसंबंधांवर गदा आल्यामुळें त्यांच्यांत असंतोष निर्माण झाला. त्यांनीं या आक्रमणाचा प्रसंगविशेषीं हिंसात्मक मार्गाचा देखील अवलंब करून प्रतिकार केला आहे. उलट त्यांची मिरासदारी अधिक वेगानें नाहींशी करावी अशीहि चळवळ सुरू आहे.

(३) स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशांत हिंदूंचा जीवनविषयक दृष्टिकोण प्रभावी व्हावा अशी अनेकांची इच्छा होती. तथापि आमच्या विशिष्ट राजकीय पार्श्वभूमीवर राज्याला ऐहिक निधर्मी स्वरूप येणेंच जरूर होतें. यामुळें हिंदूंपेक्षां अन्यधर्मीयांनाच अधिक लाभ मिळेल असा ग्रह निर्माण झाला आहे.

(४) एकच भाषा बोलणाऱ्या सर्वांचें एकच घटक राज्य असावें, भाषावार प्रांतरचना व्हावी ही इच्छा अनेकांच्या मनांत आहे. ती योग्य असली तरी सध्या तिला अनुकूल व प्रतिकूल असे दोन्ही प्रकारचे विचारप्रवाह आढळतात.

असंतोषाची महत्त्वाची कारणपरंपरा अशा तऱ्हेनें मांडतां येईल. या असंतोषाचा वा तज्जन्य वैफल्याचा परिणाम देशांतील तरुण पिढीवर होत आहे ही अत्यंत चिंताजनक घटना होय. देशांतील रचनात्मक कार्याचा उठाव होण्यासाठीं तरुणांचेंच सहकार्य उपयुक्त ठरणार आहे. तथापि अशा कार्यासाठीं सामान्य जनतेंत, आणि विशेषतः तरुणांत, उत्साह निर्माण करण्याचे फारच थोडे प्रयत्न होत आहेत. मूलभूत ध्येयाविषयीं एकमत होणें, त्या आधारावर उभारलेला मूर्त कार्यक्रम जनतेपर्यंत पोहोंचवला जाणें आणि तो पुरा होण्यासाठीं उत्साह व सहकारबुद्धि निर्माण होईल अशा प्रकारचें मानसिक वातावरण तयार होणें जरूर आहे. मॅनहाइमनें म्हटल्याप्रमाणें मूल्यें, संस्था आणि शिक्षण यांच्यांत संवादित्व असण्याची आज गरज आहे.

## मानसशास्त्रज्ञाचा दृष्टिकोण

(श्री. आर्. जे. चिनवाला)

भावनात्मक असुरक्षितता आणि इच्छा अतृप्त रहाण्याची शक्यता मान्य करण्याच्या प्रवृत्तीचा अभाव यांतून असंतोष आणि वैफल्य उद्भवतात. जुन्या श्रद्धा (उदा० धर्मविषयक) ढासळूं लागल्यामुळें आणि नव्या श्रद्धांच्या (उदा० लोकशाही, कम्युनिझम) अपुरेपणामुळें वैफल्य वाढतें. जीवनांतील महत्त्वाचे आधार नाहींसे होऊं लागल्यामुळें माणसाला आपल्या पायावर उभें रहाणें भाग पडतें आणि जिवंत रहाणें—अस्तित्व कायम राखणें—हाच व्यक्तीच्या जीवनांतील मुख्य प्रश्न बनतो. व्यक्तीच्या जीवनां-










तील या घटनेचीं बीजें तिच्या लहानपणच्या अ-प्रगल्भ भावनात्मक जीवनांतच आढळतात. लहान मूल नंदनवनाचा हव्यास धरतें, मातापित्यांवर प्रेम आणि त्यांचा द्वेषहि करतें, त्यांना देव वा दानव समजतें. आपल्या देशांत राज्यकर्ते आणि जनता यांच्या संबंधांतहि हीच गोष्ट स्पष्टपणें दिसून येते. अनेकजण ज्या पुढाऱ्यांचा द्वेष करतात तेच पुढारी बहुमतानें पुनः सत्तारूढहि होतात. मुलाच्या इच्छा पूर्ण न केल्यामुळें पित्याचा द्वेष केला जातो, परंतु त्याबरोबरच मूल त्यावर अवलंबून असल्यामुळें तें असुरक्षिततावस्थेंतून सुरक्षित होण्यासाठीं त्याचाच आधार घेते.

गृह वा व्यक्तिगत जीवन हें राजकीय जीवना-पासून अलग करतां येत नाहीं. आईबापांना करावा लागलेला त्याग, घरांत दिसून येणारा लहानमोठे-पणा, कटकटी, अनेकांचा स्थानत्याग, धार्मिक वा वर्गीय स्थान, जातिसंस्था इत्यादींचा व्यक्तीच्या विकासावर परिणाम होतो. समाजांतील निरनिराळे गट एकमेकांपासून जोंवर अलग अलग रहातात तोंवर त्यांच्यांत चिंता, असुरक्षितता, भीति, संशय, हेवा, अविश्वास, द्वेष आणि शोषकवृत्ति यांचेंच वातावरण असणें अपरिहार्य आहे. देशांतील जातीय मनोवृत्तींचें हेंच वैशिष्ट्य होय. भीति, चिंता व द्वेष यावर आधारलेली प्रत्येक जातीची अशी विशिष्ट आचार-विचार प्रणाली निर्माण होते. त्या आचार-विचारांच्या मुळाशीं असलेल्या भावना या 'टाबू' व कर्मकांडविषयक धार्मिक विधिनिषेधांच्या भ्रमांतून, आणि तात्त्विक आभासांतून उद्भवल्या आहेत. भीति, असहिष्णुता, उद्धटपणा, उच्चनीचत्व, अन्य गटां-विषयीं पूर्णपणें बेफिकीर वृत्ति इत्यादि अनेक विकार त्यांत मोडतात. राजकीय पक्षोपपक्षांची देखील अशाच प्रकारच्या गटांत गणना करतां येईल.

सगळया अनिष्टांचें निराकरण करील असा एखादा तोडगा शोधूं पहाणें आणि सांस्कृतिक व मानसिक जीवनक्रम चटकन बदलूं शकेल अशी अपेक्षा बाळगणें हें यक्षिणीच्या कांडीनें सर्व कांहीं बदलेल असें मानणाऱ्या लहान मुलाच्या इच्छेसारखेंच आहे. " स्वातंत्र्यासाठीं लढा " हा देखील स्वतःचें परावलंबित्व नष्ट झालें आहे हें सिद्ध करण्याच्या बालसुलभ प्रवृत्तीचाच आविष्कार होय. त्याऐवजीं ' स्वातंत्र्यासाठीं सहकार्य करा ' या अधिक परिपक्व वृत्तीचाच अवलंब करणें इष्ट होय. हीच वृत्ति जीवनाच्या विविध पातळींवरील प्रश्नांकडे पहातांना उपयोगांत आणली पाहिजे. असें झाल्यास व्यक्तींचे आपापसांतील संबंध सुधारतील व असंतोष आणि वैफल्याची तीव्रता कमी होईल असें वाटतें.

**व्यापारी दृष्टिकोण :१: (श्री. एफ्. एम्. शहा)**

ही चर्चा जर एक वर्षापूर्वीं ठेवण्यांत आली असती तर मी तिच्यांत भाग घेण्याचें नाकारलें असतें. मी १९४० च्या नंतर व्यापारांत पडलों आणि तेव्हां-पासून मी केवळ समृद्धीचाच अनुभव घेतला आहे.

व्यापारी वर्गांत असंतोष निर्माण होण्याचें कारण म्हणजे १९५२ च्या आरंभीं आलेली मंदी हें होय. ह्या बाबतींत सरकारचें आयात-निर्यात-विषयक नियंत्रणाचें धोरण हें बऱ्याच अंशीं जबाब-दार आहे. आयातीस भरपूर अवसर दिल्यामुळें देशांतील किंमती घसरल्या. अनेकांचें नुकसान झालें. किंमती घसरूं लागल्यामुळें घेतलेल्या कर्जाची व्यापाऱ्यांकडून मागणी सुरू झाली. व कर्जफेड करतां यावी म्हणून व्यापाऱ्यांनीं मालाचे सांठे विक्रीस काढले. त्यायोगें किंमती अधिकच ढांसळल्या. ही सर्व परिस्थिति सरकार प्रत्यक्ष कांहीं मदत करण्याऐवजीं केवळ प्रेक्षक म्हणून पहात होतें. १९५२ च्या उत्तरार्धांत परिस्थिति थोडीबहुत निवळली. आणि सरकारनेंहि भरपूर प्रमाणांत उपलब्ध असलेल्या मालाची आयात बंद केली.

नफा मिळूं शकेल अशा प्रकारचा नवा व्यवहार आतां बहुतांशीं नाहींसा झाला आहे; आणि








अनेकांना आपल्या धंद्यांतील चालू खर्चही पुरा करणें कठिण होऊं लागलें आहे. नफा कमी होत आहे परंतु खर्चात कोणत्याही प्रकारें काटकसर करता येणें शक्य नाहीं. त्यांतच विक्रीकरासारख्या करामुळें अडचणी अधिक वाढल्या आहेत.

व्यापाऱ्यांत वैफल्य आहे. तथापि भावी काळ चांगला येईल याबद्दल त्यांना आशाहि वाटत असून ते धैर्यानें चांगल्या परिस्थितीची प्रतीक्षा करीत आहेत.

### व्यापारी दृष्टिकोण : २ : (एस्. के. भुवालका)

व्यापार वा उद्योगधंदे यांतील माणसें म्हणजे भल्याबुऱ्या मार्गांनीं संपत्ति मिळवणारीं आणि आजच्या सर्व अनिष्टांना जबाबदार असलेलीं माणसें होत असा एक समज आहे. परंतु तो खरा नाहीं. व्यापारी व उद्योगपती हे निरनिराळ्या प्रकारचे व निरनिराळ्या श्रेणींतील असूं शकतात. जनतेच्या दैनंदिन जीवनाच्या आवश्यक वस्तू पुरविणारा खेड्यांतील सामान्य दुकानदार हा देखील व्यापारीच होय. आणि अशा प्रकारचे लहानसहान व्यापारी वा उद्योगधंदा करणारे हेच बहुसंख्य आहेत. तथापि त्या सर्वांना थोड्याशा बड्या व्यापाऱ्यांनीं वा कारखानदारांनीं निर्माण केलेल्या व्यवस्थेंतच आपला कारभार करावा लागतो. स्वातंत्र्यपूर्व काळांत ही व्यवस्था बहुधा इंग्रज व्यापारी व कारखानदार यांनींच निर्माण केली होती. आणि त्यांच्या तंत्रानुसार न चालणारांत असंतोष होता. ही परिस्थिति स्वातंत्र्यानंतर बदलेल अशी इतरांप्रमाणेंच याहि क्षेत्रांतील लोकांची अपेक्षा होती.

किंमती वाढलेल्या आहेत, मंदी आलेली नाहीं असें असतां या वर्गात वैफल्य निर्माण व्हावें ही एक चमत्कारिक घटना होय. स्वातंत्र्यापासून बऱ्याच मोठ्या अपेक्षा होत्या. फाळणीमुळें आपले प्रश्न पुष्कळच गुंतागुंतीचे झाले. पुढाऱ्यांना शासनाचा अनुभवहि नव्हता. या निरनिराळ्या कारणांमुळें उत्पन्न झालेल्या गोंधळाच्या परिस्थितींतूनच आजचें वैफल्य जन्मास आलें आहे असें म्हणतां येईल. त्यांतच गतवर्षी सुरूं झालेल्या मंदीमुळें भर पडली आहे. आयातनिर्यातीवरील नियंत्रणाचें धोरण आणि कारखानदारांवर सतत लादण्यांत येणारीं विविध स्वरूपांचीं बंधनें याबद्दलच आजची मुख्य तक्रार आहे.

तथापि वैफल्य निर्माण होऊं देणें इष्ट नाहीं. धंद्यांतील अडचणी प्रथम विचारांत घेतल्या म्हणजे तें निर्माण होण्याचें कारणहि राहाणार नाहीं. आजच्या अडचणींना अवास्तव महत्त्व न देतां भविष्यकाळ अधिक चांगला येईल या आशेनें आपण सतत प्रयत्न करीत रहाणें हेंच योग्य होय असें मला वाटतें.

### अर्थशास्त्रीय दृष्टिकोण (श्री. जी. आर्. दळवी)

मानवी संस्कृति संकटमय परिस्थितींत सांपडली असून सगळीकडे निराशेचें व असहायतेचें वातावरण दिसत आहे आणि मानवाचा स्वतःवरील विश्वास ढांसळत आहे. ज्या युगानें आपणांस एका बाजूस विशाल मानवी कर्तृत्वाची ओळख करून दिली त्याच आधुनिक युगांत मानवाचा प्रगतीवरील विश्वासच डळमळीत झाला आहे. स्वातंत्र्यलालसा मंदावत आहे. वैज्ञानिक व यंत्रविज्ञानविषयक विकासाचे भलेबुरे परिणाम अनुभवणारीं माणसें वैज्ञानिक दृष्टिकोण व ऐहिक अधिष्ठानावर आधारलेलें नैतिकत्व यांना आपल्या जीवनदृष्टीचें अधिष्ठान म्हणून मान्य करण्यास तयार नाहींत. वैफल्य हें या अरिष्टमय परिस्थितीचें लक्षण होय.

या परिस्थितींत जुन्या समाजसंस्था, अर्थव्यवस्था व राज्यव्यवस्था या मोडकळीस आल्या आहेत. त्यांचीं वैचारिक अधिष्ठानें चुकीचीं ठरत आहेत आणि नवा मार्ग सांपडेनासा झाला आहे. सामाजिक तत्त्वज्ञानांतील दोष, अपुरेपणा व त्याचें अपयशांमुळें उत्तरोत्तर भ्रमनिरास होऊन वैफल्य वाढत आहे.

या अरिष्टाचीं कारणें आर्थिक आहेत असा एक विचार आढळतो; परंतु तो मला मान्य नाहीं.



अनुक्रमणिका







आर्थिक कारणें हीं दुय्यम स्वरूपाचींच होत असें म्हटलें पाहिजे. सारे आर्थिक प्रश्न जरी सोडवले गेले तरी देखील आपण या अरिष्टमय परिस्थितींतून बाहेर पडूं शकणार नाहीं. सामाजिक पुनर्रचनेच्या कार्यांत व्यावहारिक दृष्ट्या जरी आर्थिक प्रश्नांचें विशिष्ट स्थान असलें तरी देखील तो प्रश्न सोडविण्यासाठीं प्रथम वैचारिक व नैतिक अडचणी दूर कराव्या लागतील असें मला वाटतें. तथापि तूर्त वर्तमान असंतोष व वैफल्य निर्माण करणाऱ्या महत्त्वाच्या आर्थिक कारणांचाच मी थोडक्यांत ऊहापोह करतों.

विज्ञान आणि यंत्रतंत्रविद्या यांच्या विकासामुळें उत्पादनसामर्थ्य पुष्कळच वाढलें असून नैसर्गिक साधनसामग्रीचा मानवी हितासाठीं मोठ्या प्रमाणांत उपयोग करणें शक्य झालें आहे. यामुळें सर्वांच्या जीवनाच्या मूलभूत गरजा पूर्ण करण्याची आणि त्यांना थोडेंबहुत आरामानें रहातां येईल अशी तरतूद करण्याची शक्यता निर्माण झाली आहे. तथापि, या उलट सामाजिक अन्याय, आर्थिक विषमता व शोषण हींच आपल्या दृष्टोत्पत्तीस पडत आहेत. यंत्रविद्येचा विकास आणि सामाजिक व आर्थिक संघटना व संबंध यांमध्यें विसंवादित्व निर्माण झालें आहे आणि सामाजिक व आर्थिक जीवनांतील तालबद्धता नष्ट होऊन त्यांत एकांगीपणा आला आहे. यंत्रविद्या आणि समाजसंस्था या दोहोंचेंही मानवी विकासास पोषक ठरेल अशा प्रकारें नव्यानें संघटन होणें जरूर आहे. याबरोबरच मानवी स्वभावासंबंधींच्या ज्ञानामुळें प्रस्थापित अर्थव्यवस्थांच्या मुळाशीं असलेल्या वैचारिक बैठकीची सदोषताहि स्पष्ट झाली आहे. गेल्या तीनशें वर्षांतील स्पर्धेवरील विश्वासावर आधारलेला आर्थिक विचार आणि त्याचा पर्याय म्हणून पुढें मांडण्यांत येणारी समुदायप्रधान तत्त्वांवर आधारलेली आर्थिक विचारसरणी या दोहोंचाही फोलपणा स्पष्ट झाला आहे. तथापि नवा मार्ग आवश्यक असूनहि तद्विषयक प्रयत्न सत्यान्वेषणाच्या निष्ठेनें फारसा होत असलेला आढळत नाहीं. यामुळें असंतोष आणि वैफल्य हीं वाढीस लागलेलीं आढळतात.

आजच्या अर्थव्यवस्थेंत अनेक दोष आहेत आणि त्यांचे अनिष्ट परिणाम हे सर्वांच्या परिचयाचे आहेत. तिच्यांत सर्वांना समान संधि मिळत नाहीं; अनेकांच्या जीवनाच्या किमान गरजा देखील पुऱ्या होऊं शकत नाहींत. आर्थिक पिळणूक होते आणि संपत्ति विषम प्रमाणांत विभागली जाते. बेकारी, सट्टेबाजी आणि आर्थिक अरिष्टें उद्भवतात. सामाजिक व आर्थिक असुरक्षितता, वितुष्ट, कलह इत्यादि उद्भवतात; आणि यांचीच युद्धाच्या स्वरूपांत परिणति झाल्यानें असुरक्षितता अधिकच वाढते. लोकांच्या मनांत अशा परिस्थितींत असंतोष निर्माण होणें अपरिहार्य आहे. सर्वांना समाधानानें रहातां येणें शक्य आहे अशी परिस्थिति असतांनाहि वरील अवस्था निर्माण व्हावी ही खरोखरीच खेदाची गोष्ट होय.

या अवस्थेंतून मार्ग काढण्याचे प्रयत्न सामाजिक तत्त्ववेत्ते व अर्थशास्त्रज्ञ विचारवंत करीत आहेत. तथापि त्यांच्या प्रयत्नांतील मूलभूत प्रमेयें जुनींच असल्यामुळें ते प्रयत्न फारसे फलदायी होऊं शकत नाहींत; उलट वैफल्यच वाढतें.

आजच्या आर्थिक विचारांतील मूलभूत आणि तांतडीचा प्रश्न नियोजन आणि स्वातंत्र्य यांत संवादित्व निर्माण करणें हा आहे. जुनें आपोआपीचें अर्थशास्त्र व अर्थव्यवस्थेंत राज्यानें कसलीही ढवळाढवळ करतां कामा नये हा विचार हीं मागें पडलीं आहेत आणि आर्थिक व्यवहाराचें योग्य मार्गदर्शन करणें आवश्यक झालें आहे. तथापि सामुदायिक नियोजन आणि आर्थिक नियंत्रणें यांतून हुकूमशाही उद्भवते असा अनुभव आहे. ही शक्यता टाळणारा आर्थिक नियोजनाचा मार्ग शोधून काढणें ही आजची








अर्थशास्त्रज्ञ विचारवंतांची खरी जबाबदारी आहे. अशी अर्थव्यवस्था निर्माण करणें शक्य आहे असें मला वाटतें. मात्र त्यासाठीं वैज्ञानिक, मानवतावादी सामाजिक तत्त्वज्ञानावर निष्ठा आणि आर्थिक संबंधांतील मूलभूत तत्त्व म्हणून सहकार्य करण्याची वृत्ति यांचें संवर्धन होणें आवश्यक आहे.

## राज्यशास्त्राचा दृष्टिकोण (प्रा. गोवर्धन पारीख)

राज्यशास्त्राचा दृष्टिकोण म्हणजे राजकीय कार्यकर्त्याचा दृष्टिकोण नव्हे. राजकीय कार्यकर्त्यांचे हितसंबंध अनेक वेळां असंतोषावर आधारलेले असतात आणि कारणावांचून असंतोष निर्माण करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. आजच्या चर्चेत अशा प्रकारें निर्माण करण्यांत येणाऱ्या असंतोषाचा वेगळा विचार होणें जरूर आहे. त्याचप्रमाणें असंतोष हा केवळ आपल्यांतच आहे असें नव्हे. जगांत सगळींकडे तो आढळतो आणि त्या जागतिक असंतोषाचीं कारणें येथेंहि थोड्याबहुत प्रमाणांत दिसून येतात. तींहि अलगपणें विचारांत घेणें जरूर आहे. त्याचप्रमाणें देशांतील सर्वव्यापी असंतोषाचीं कारणें आणि मर्यादित क्षेत्रांत आढळणाऱ्या विशिष्ट असंतोषाचीं कारणें यांतहि फरक करणें जरूर आहे. तात्पर्य, असंतोषाचा प्रश्न हा अत्यंत गुंतागुंतीचा प्रश्न आहे. तो व्यवस्थितपणें उकलणें हें अत्यंत नाजूक आणि परिश्रमाचें काम आहे. म्हणूनच आज ही सारी दगदग करण्याचें सोडून 'आदर्श' समाजरचनेचीं स्वप्नें पहाण्याकडे आणि सभोंवतालीं आढळणारें सर्व कांहीं नाहींसें केलें पाहिजे असें म्हणण्याकडे अनेकांची प्रवृत्ति होत आहे. कारण तो मार्ग त्यांना सोपा वाटतो.

असंतोष हा नेहमींच अनिष्ट असतो असें समजण्याचें कारण नाहीं. कित्येकदां त्यांत 'दैवी' घटकहि आढळतात; तेव्हां तो प्रगतीकडे नेतो. सभोंवतालची परिस्थिति आणि आपण स्वतः अशा दोहोंतही योग्य बदल करून दोहोंची व्यवस्थित जुळणी होऊं शकेल असे प्रयत्न करण्यास त्यांतून उत्तेजन मिळतें. तथापि आज आपणांस अशा प्रकारच्या 'सॉक्रेटिसाच्या असंतोषा'शीं कर्तव्य नसून वैफल्य निर्माण करणारा असंतोषच फक्त विचारांत घ्यावयाचा आहे. अशा प्रकारचा असंतोष जसा न्याय्य किंवा रास्त असूं शकेल तसाच तो असमर्थनीय किंवा मुद्दाम निर्माण केलेला देखील असूं शकेल. परिस्थितीच्या पुरेशा योग्य आकलनावर आधारलेला, तिच्या मर्यादा ध्यानांत घेऊन निर्माण झालेला असंतोष म्हणजे रास्त असंतोष होय. त्यांत असंतोषास जबाबदार असलेलीं कारणें दूर करण्याची वा होण्याची शक्यता अंतर्भूत होते. ही शक्यता सगळयाच असंतोषांत असते असें म्हणतां येईल. तथापि असमर्थनीय असंतोषांत परिस्थितीबाबत अर्धवट वा पूर्ण अज्ञान असतें आणि मुद्दाम निर्माण केलेल्या असंतोषांत परिस्थितीबद्दल विपर्यास जाणून बुजून केलेला असतो. रास्त असंतोषांतून असहायतेमुळें वैफल्य येऊ शकतें. असमर्थनीय असंतोषांतील वैफल्य हें अज्ञानजन्य असतें. कृत्रिमपणें निर्माण केलेल्या असंतोषांत परिस्थितीचें योग्य आकलन करून घेण्याचा प्रयत्न न केल्यामुळें वैफल्य निर्माण होतें. अशा प्रकारचा असंतोष आज ज्यांना आपल्या तात्पुरत्या हितसंबंधांपलीकडे जाऊन विचार करणें शक्य आहे अशा बहुतांशीं मध्यम श्रेणींतील लोकांतच विशेषतः आढळतो असें म्हणतां येईल.

या असंतोषाचीं बीजें बऱ्याच अंशानें स्वातंत्र्यपूर्व राजकीय चळवळींत सांपडतात. आपली राजकीय चळवळ बहुतांशीं अकरणात्मक किंवा अभावात्मक होती. तिच्यामुळें इंग्रजी राज्य गेल्यानंतर निर्माण होणाऱ्या परिस्थितीबद्दल अनेक मोटमोठ्या व अतिरंजित अपेक्षा निर्माण झाल्या. इंग्रजी राज्य जातांच अपेक्षित व प्रत्यक्षप्राप्त यांच्यांतील फरक सर्वांच्या प्रत्ययास येऊं लागला व भ्रमनिरास होण्यास सुरवात झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या कार्याचें









अनुक्रमणिका

## आपल्यामधील वर्तमान असंतोष आणि वैफल्य

स्वरूप व तद्विषयक प्रत्यक्ष जबाबदारी यासंबंधीं कधींच फारसा विचार झाला नसल्यामुळें, स्वातंत्र्य मिळतांच रचनात्मक क्रियाशीलतेचा प्रत्यय येण्याऐवजीं केवळ अपेक्षा व आकांक्षाच व्यक्त होऊं लागल्या. स्वातंत्र्य ही एक संधि होय या दृष्टीनें तिकडे पहाण्याऐवजीं तें अनेकांना यक्षिणीच्या कांडीप्रमाणेंच वाटलें. त्यांतच आपलें मर्यादित अर्थानें कां होईना पण राजकीय ध्येय आपण गांठू शकलों नाहीं यामुळें अधिकच भर पडली. स्वातंत्र्य मिळालें परंतु देशाची फाळणी झाली. आणि रचनात्मक कार्याच्या उत्साहाऐवजीं लक्षावधी देशबांधवांना पुनः आपलें भंगलेले संसार मांडता यावेत यासाठीं आवश्यक ती सहानुभूति , विवेक व शांति यांचीच आमच्या जीवनांत अधिक मोठी गरज निर्माण झाली !

आमच्यांतील वर्तमान असंतोषाची अशीं हीं दोन मूलभूत कारणें सांगतां येतील. त्यांचेंच प्रतिबिंब आजच्या राजकीय पक्षोपपक्षांत व विचारसरणींत पडलेलें आढळतें. दैनंदिन जीवनाचे प्रश्न सोडवितां यावेत यासाठीं प्रस्थापित समाजव्यवस्थेंत बदल करण्याची आवश्यकता कमीअधिक प्रमाणांत पुढें मांडणारे पक्षोपपक्ष पहिल्या प्रकारांत मोडतात. आणि फाळणी वा तिचे परिणाम यांपासून देशाची मुक्तता केली पाहिजे असें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें म्हणणाऱ्या पक्षांची दुसऱ्या प्रकारांत गणना करतां येईल.

राजकीय चळवळीच्या अभावात्मक स्वरूपामुळें संख्येला विशेष महत्त्व आलें. राष्ट्रीय चळवळींत सामील झालेल्या लाखों लोकांचे प्रांतिक, धार्मिक, जातीय इत्यादि निरनिराळे अभिमान त्यामुळें कायम राहिले आणि मूलभूत एकजिनसीपणा आमच्यांत कधींच निर्माण होऊं शकला नाहीं. हा एकजिनसीपणाचा अभाव सर्वस्वीं अनिष्टच आहे असें समजण्याचें कारण नाहीं. उलट, एकजिनसीपणामुळें सत्तेचें अत्यंत मोठ्या प्रमाणांत केंद्रीकरण होण्याची म्हणजेच राष्ट्रीय चळवळ हुकूमशाहीकडे कलण्याची शक्यता कितीतरी वाढली असती. तसें न झाल्यामुळें आज देशांत लोकशाही निर्माण करण्याची संधि आपणांस मिळाली आहे. आणि या संधीच्या स्वरूपाचें यथार्थ आकलन न झाल्यामुळें आज बराच असंतोष आढळत आहे असें म्हणतां येईल.

राज्यघटना, आर्थिक नियोजन , भाषावार प्रांतरचना किंवा अन्य अनेक सामाजिक व सांस्कृतिक प्रश्न सोडवण्याबाबतच्या आमच्या धोरणांत हा आकलनाचा अभावच दृष्टोत्पत्तीस येतो. कागदावर प्रभावी केंद्रीय सत्ता तयार केली जाते; पण प्रत्यक्ष राजकीय जीवनांत ती दुबळी व निरनिराळ्या प्रांतिक घटकशक्तींच्या चढाओढीवरच अवलंबून रहाते. केंद्राला प्रत्येक वेळीं घटक राज्यांच्या धोरणावर अवलंबून रहावें लागतें आणि एखादें सामान्य राष्ट्रीय धोरण त्यांच्या गळीं उतरविणें जड जातें. आर्थिक योजना ही देखील अशा प्रकारच्या प्रांतिक शक्तींच्या चढाओढींचाच परिपाक आहे, असें म्हणतां येईल. यामुळें मूलभूत एकजिनसीपणा गृहीत धरणाऱ्या पार्लमेंटरी लोकशाहीस येथील राजकीय परिस्थिति कितपत अनुकूल आहे हा एक प्रश्नच आहे. येथें केवळ बहुमताचें राज्य इतकाच लोकशाहीचा अर्थ करून भागणार नाहीं. त्यांतून कदाचित् संघटित बहुमताची अत्यंत हीन स्वरूपाची झोटिंगशाही देखील निर्माण होऊं शकेल. म्हणून या तंत्राव्यतिरिक्त निरनिराळ्या प्रांतिक वा सामाजिक गटांमध्यें वाढत्या प्रमाणांत संवादित्व निर्माण होऊं शकेल आणि ते गट समाधानानें एकत्र राहूं शकतील अशा प्रकारच्या प्रयत्नांचीहि गरज आहे. याकरितां नसलेलें ऐक्य लादण्याच्या प्रयत्नाऐवजीं संवादित्व निर्माण करूं पहाणारा दृष्टिकोणच मान्य होणें जरूर आहे. आणि त्यासाठीं आमचें लक्ष दिल्लीकडून आमच्या लोकशाहीच्या स्थानिक घटकांकडे वळलें पाहिजे.

भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाचें उदाहरण घेतलें तर हें म्हणणें सहज स्पष्ट होईल. या प्रश्नासंबंधीं










जास्त ऊहापोह करण्याची गरज नाहीं. फक्त त्याबाबत योग्य असा निकोप दृष्टिकोण आज फारसा आढळत नाहीं हें ध्यानांत घेणें जरूर आहे. प्रांतीयत्वाला गणवाद ( tribalism ) म्हटल्यानें काम भागणार नाहीं; कारण राष्ट्रवाद हा देखील त्यांतच मोडूं शकेल. म्हणून या बाबतींत तारतम्य बाळगून निरोगी प्रांताभिमानाला वाव देणें आणि प्रांताभिमानांत अनेकवार आढळणाऱ्या संकुचित मनोवृत्ती टाळणें याची खरी गरज आहे. खरें देशप्रेम आपल्या गांवावरील प्रेमांतूनच जन्म घेतें; त्यावांचून तें अमूर्त वा परंपरागत स्वरूपांतच राहील. अशा प्रकारच्या तारतम्यबुद्धीनें प्रस्तुत प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न होण्याऐवजीं तो राजकीय दडपणाखालीं होत आहे. आणि त्यामुळें अनेक प्रकारचे टाळतां येण्याजोगे कलह निर्माण झाले आहेत. वास्तविक या बाबतींतील अपेक्षा राष्ट्रीय चळवळीनेंच निर्माण केल्या; आतां त्या पुऱ्या न करणें म्हणजे आपला भूतकाळ नाकारण्यासारखें आहे. याऐवजीं भाषाभिमानाचे निरोगी आविष्कार इष्ट मानून निरनिराळ्या गटांत प्रेमाची व सहकार्याची भावना जागृत होईल असे प्रयत्न करणें हेंच इष्ट होईल. यांतून राष्ट्रीय ऐक्याला धक्का पोहोंचेल असें समजण्याचें कारण नाहीं. उलट, सामाजिक विस्कळितपणा व विभजन निर्माण करूं पहाणाऱ्या शक्तींना या प्रश्नाचा फायदा घेणें अशक्यच होईल.

आजच्या परिस्थितीचें दुसरें एक वैशिष्ट्य म्हणजे चळवळींतून जन्माला आलेलें राष्ट्रीय नेतृत्व चटकन् तांत्रिक स्वरूपाचें बनलें हें होय. जनतेचे लाडके पुढारी हे आतां तिचे नियुक्त प्रतिनिधी झाले आहेत. निवडणुकीच्या वेळीं जनतेला येन केन प्रकारेण अनकूल करणें हाच पुढारीपणाचा पाया झाला आहे. उलट जनतेच्या सुखदुःखांत भाग घेणारें, तिच्याशीं समरस होण्याचा प्रयत्न करून त्या आधारावर तिला अनुकूल बनवूं पहाणारें नवें नेतृत्वहि निर्माण होत असलेलें दिसत आहे. आणि त्याचाही आधार चळवळयेच असल्याकारणानें आजच्याच अनुभवाची पुनरुक्ति होणें शक्य आहे. ती टाळावयाची झाल्यास आमच्या लोकशाहींत चळवळ्या नेत्यांच्या ऐवजीं लोकशिक्षक निर्माण होण्याची गरज आहे. अशा शिक्षकांच्या प्रयत्नांतूनच जनतेचें ज्ञान व आत्मविश्वास वाढीस लागण्याचा संभव आहे. त्यांवाचून लोकशाहीचा पाया मजबूत होणें शक्य नाहीं.

असंतोषाचा प्रश्न हा अत्यंत व्यापक आणि गुंतागुंतीचा आहे. एकाद्या विशिष्ट ज्ञानशाखेच्या दृष्टिकोणांतून विचार केल्यानें त्याचा पूर्णतया उकल होणें शक्य नाहीं. त्यावर करावयाची उपाययोजना ही देखील व्यापक दृष्टिकोणांतून निश्चित केली गेली पाहिजे. वैफल्य हें एक मोठें वैयक्तिक व सामाजिक अरिष्टच होय. तें घालवण्यासाठीं माणसें आणि सामाजिक संस्था या दोहोंतही बदल होणें आवश्यक आहे. वैफल्याचीं बीजें असहायता आणि परिस्थितीचें अर्धवट वा विकृत आकलन यांत सांपडतील. यापैकीं दुसऱ्या कारणावर लोकशिक्षण हा उपाय होय. तथापि त्याबरोबरच असहायता नष्ट होण्यासाठीं ज्या योगानें सामान्य जनतेला शासनकार्यांत अधिकाधिक भाग घेतां येईल आणि तिचा आत्मविश्वास वाढीस लागेल अशा प्रकारच्या शासनसंस्थांची उभारणी होणें आवश्यक आहे. आणि राज्यशास्त्र या बाबतींत थोडेंबहुत मार्गदर्शन करूं शकेल असें वाटतें.

---

## ‘ सुंदर कविता ’!

वास्तवाचिया किनाऱ्यावरी
मम स्वप्नांच्या फुटल्या लाटा
सप्तरंगी ते तुषार पाहुन
रसिक बोलला ‘सुंदर कविता ! ’

—दत्तात्रेय कुलकर्णी



अनुक्रमणिका






श्री. एन्. सी. एन्. आचार्य

# आंध्र राज्याची स्थापना

**एक ऑक्टोबर १९५३** हा दिवस आंध्रांना खचित सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवावा असें वाटेल. कारण भारतीय संघराज्याच्या अध्यक्षांची नुकतीच संमति मिळालेल्या १९५३ च्या आंध्रराज्यकायद्याप्रमाणें १ ऑक्टोबर १९५३ ला आंध्र राज्याची प्रस्थापना होणार आहे. नवीन आंध्र राज्याची राजधानी कुर्नुल येथें असून तेथेंच आंध्र राज्याचें उद्घाटन होणार आहे. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भाषावार विभागणीच्या आधारें प्रत्यक्ष अस्तित्वांत येणारें पहिलें राज्य हें आंध्र राज्य होय. आंध्रांची ही स्वतंत्र प्रांताची मागणी १९१३ च्या सुमारास सर बी. एन्. शर्मा यांच्या अध्यक्षतेखालीं बापटला येथें भरलेल्या पहिल्या आंध्र परिषदेच्या अधिवेशनांत मांडली गेली. तेव्हांपासून वर्षानुवर्षे भरणाऱ्या आंध्र परिषदांतून ठरावावर ठराव करून ही मागणी सारखी चालूं ठेवण्यांत आली. हिंदी व बंगाली भाषाभाषिकांच्या नंतर तिसरा मोठा भाषिकांचा समूह म्हणजे तीन कोटी आंध्रभाषिकांचा होय. आंध्र परिषदांनीं भाषावार प्रांतविभागणीचा पुरस्कार केल्यानंतर, कर्नाटक, महाराष्ट्र, केरळ हे देखील राज्यकारभाराच्या सोयीकरितां स्वतंत्र भाषावार प्रांत व्हावे अशी त्या त्या भाषिकांकडून मागणी करण्यांत आली.

## पूर्वेतिहास

मांटेग्यू-सुधारणा यायच्या आधींपर्यंतहि आंध्रांची ही चळवळ अबाधित चालूच होती. मांटेग्यू हिंदुस्थानांत यायच्या आधीं, १९१७ मध्यें आंध्रपरिषदेचें खास अधिवेशन भरलें होतें. त्यानंतर त्यावेळचे सुप्रसिद्ध लोकप्रिय कांग्रेसपुढारी 'आंध्र भीष्म' कै. एन्. सुब्बाराव पंतुलु यांच्या नेतृत्वाखालीं एका शिष्टमंडळानें मांटेग्यूसाहेबांची भेट घेऊन संपूर्ण प्रांतिक स्वायत्ततेनें युक्त अशा आंध्र प्रान्ताबद्दल मागणी केली. त्यानंतर प्रसिद्ध झालेल्या मांटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत त्या वेळची प्रांतरचना राज्यकारभाराच्या दृष्टीनें किती कृत्रिम व गैरसोयीची आहे याचा उल्लेख आला असून लहान, सुटसुटीत व अधिक एकजिनसी प्रांत निर्माण करावेत, अशीहि शिफारस त्या रिपोर्टांतून केली गेली.

त्यानंतर लवकरच भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाचा पुरस्कार करावयाचा भारतीय राष्ट्रसभेनें चंग बांधला. १९१७ च्या सुमारास, मद्रास प्रांताच्या कॉंग्रेस कमिटीमधूनच आंध्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी निराळी काढली गेली व अशा रीतीनें भाषावार विभागणीचें बीज परिणामकारक रीतीनें पेरलें गेलें. तेव्हांपासून मद्रास इलाख्यांत असलेले जे दुसरे भाषिक गट त्यांच्यापासून अगदीं ठळक वेगळेपणानें आंध्रांनीं परकीय सत्तेविरुद्ध चालू असलेल्या भारतीय स्वातंत्र्यसंग्रामांत धडाडीनें भाग घेतला. पुढें राष्ट्रीय सभेचे गांधीजी नेते झाले व आंध्र ज्या भाषावार विभागणीच्या तत्त्वावर वेगळा झाला त्याच तत्त्वाची तर्कशुद्ध कांटेकोर अंमलबजावणी होऊन कॉंग्रेसचें स्वतःचें असें तामिळनाड, केरळ, महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ, महाकोसल, सिंध, ओरिसा, वायव्य सरहद्दप्रांत, बंगाल, बिहार हे प्रांत अस्तित्वांत आले. या प्रांतांतील लोकांनीं पुढें अखिल भारताच्या दीर्घ आणि घोर अशा राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामांत जो आवेशानें व उत्साहानें भाग घेतला, त्यामागें त्यांना आपापल्या आंतरिक ऐक्याचा मोठा आधार वाटत होता.

---

श्री. एन्. सी. एन्. आचार्य हे मुंबई येथील आंध्र असोशिएशनचे प्रमुख कार्यकर्ते असून हायकोर्टांत ओरिजिनल साइडचे ॲडव्होकेट आहेत. त्यांनीं 'नवभारता'करितां मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा प्रस्तुत लेख अनुवाद आहे— का. सं.

देशानें ज्यावर बहिष्कार टाकला अशा कुप्रसिद्ध सायमन कमिशननें शिफारस केल्याप्रमाणें, सिंध, ओरिसा, वायव्यसरहद्दप्रांत हे गव्हर्नमेंट ऑफ इंडिया कायदा १९३५ अन्वयें निराळे प्रांत बनविले गेले. सायमन कमिशननें आंध्रांच्या आग्रही मागणीचा उल्लेख करून असें स्पष्ट म्हटलें होतें कीं, हल्लींच्या बहुभाषिक प्रांतांमध्यें जे भाषिक भेद आहेत त्यांना फार राजकीय महत्त्व असून त्यामुळें आंध्र-प्रांताची मागणी राजकीय दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. त्याआधीं मद्रास विधिमंडळानें स्वतंत्र आंध्र प्रांत निर्माण करण्याच्या मागणीला संमति देणारा जो ठराव केला होता त्याचाहि सायमन कमिशननें उल्लेख केला. पण इतकें आपलें मतप्रदर्शन करूनहि सायमन कमिशननें आंध्र प्रांत वेगळा करावा अशी स्पष्ट शब्दांत शिफारस केली नाहीं. याचें कारण, आंध्रांच्या बाजूनें बहिष्कृत कमिशन-पुढें जाऊन कोणी आपली बाजू मांडली नव्हती. आंध्रांच्या पुढें त्यावेळेला स्वराज्यसंपादनाच्या मागणी-ला पहिला अग्रमान असून त्यानंतरचा दुसरा मान आंध्र प्रांताच्या मागणीला होता. भारतीय स्वराज्याच्या ध्येयानें प्रेरित होऊन राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामांत भाग घेत असतांना, राज्यकारभाराच्या गैरसोयी व तज्जन्य हालअपेष्टा यांच्याकडे आंध्रांनीं दुर्लक्ष केलें. आंध्रांनीं जी ही अत्यंत भूषणावह अशी स्वार्थत्यागबुद्धि प्रकट केली तिच्यामागें त्यांना एक अशी दृढ आशा होती कीं, " स्वराज्यप्राप्तीनंतर आपला एक स्वतंत्र आंध्र प्रांत निर्माण होऊन आपणांस भारतीय संघराज्यांत एक मानाचें स्थान मिळेल, आपला स्वतंत्र असा भाषिक प्रांत झाला कीं आपल्या प्रकृत्यनुसार आपली विशिष्ट संस्कृति, भाषा व हितसंबंध यांचें संवर्धन आपणांस करतां येईल. "

यानंतर आंध्र प्रांताची मागणी उत्तरोत्तर वाढत जाऊन तिला धार चढत गेली. १९२७ सालीं मद्रासच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलनें एक ठराव पास करून अशी मागणी केली कीं, मद्रास प्रांतांत तेलुगुभाषी लोकांचे सलग भाग एकत्र करून कायदा, कारभार व न्याय यांच्या अंमलबजावणीकरितां एक निराळा प्रांत करावा. १९२८ मध्यें, आंध्र प्रांत बनविला नाहीं, म्हणून मद्रास सरकारवर एक निंदाव्यंजक कपातसूचना पास झाली. १९३३ मध्यें मद्रास लेजिस्लेटिव्ह कौन्सिलनें असाच एक ठराव पास केला. १९३८ मध्यें सुप्रसिद्ध आंध्र पुढारी देशभक्त वेंकटप्पय्या यांनीं आंध्र प्रांत बनवि-विण्याबद्दल एक ठराव मांडला होता. श्री. चक्रवर्ती राजगोपालाचार्य—ज्यांच्यावर आंध्रांच्या मागणीला ते प्रतिकूल होते व आहेत म्हणून आरोप केला जातो ते राजगोपालाचार्य—त्यावेळीं मद्रासचे मुख्य प्रधान असून त्यांनीं वेंकटप्पय्यांच्या ठरावाला पाठिंबा दिला होता ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. १९३८ सालीं एक व दुसरी १९४३ सालीं अशा भरलेल्या आंध्रपरिषदां-नीं मद्रास-राजधानीसहित आंध्र प्रांताच्या मागणीचे ठराव पास केले.

काँग्रेसनें १९३६ सालीं निवडणुकी लढविल्या. त्यावेळच्या निवडणुकीच्या जाहिरनाम्यांत, राष्ट्रांतील प्रत्येक गट व प्रत्येक प्रादेशिक विभाग यांना आपापलें जीवन व संस्कृति यांचा विकास करण्याचें स्वातंत्र्य द्यावयाचें काँग्रेसनें वचन दिलें होतें. असे प्रादेशिक विभाग किंवा प्रांत बनवितांना भाषा व संस्कृति लक्षांत घेतली जाईल असेंहि काँग्रेसनें लोकांना आश्वासन दिलें होतें. त्यानंतर मतदारसंघाचा अनुकूल कौल पडून काँग्रेस अधिकारारूढ झाली. साहजिकच आंध्र प्रांताच्या आंदोलनाला दुप्पट जोरानें व हिरिरीनें चालना मिळाली. १९४७ सालीं मद्रास विधि-मंडळाच्या दोन्हीहीं सभागृहांनीं आंध्र प्रांत बनविण्याबद्दल एक-मुखानें ठराव पास केले. त्यानंतर भारताचे मुख्यप्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांनीं १९४७ च्या नोव्हेंबरमध्यें गंभीर घोषणा करून असें सांगितलें कीं ' आंध्रराज्य-निर्मितीच्या मार्गांत आता कोणतीच अडचण उरलीं नाहीं.' तथापि शेवटीं भारतीय राज्यघटनेवर जेव्हां शिक्कामोर्तब झालें तेव्हां तींत आंध्र राज्याचा समावेश झाला नाहीं. राज्यघटनेतील राज्यांच्या यादींत आंध्र राज्य समाविष्ट करण्याचें आंध्रांचे प्रयत्न निष्फळ ठरले !

## श्रीरामूलूंचें बलिदान

निराशा आणि वैफल्य यांनीं ग्रासलेल्या आंध्रांना साहजिकच असें वाटलें कीं भारतीय सरकार टंगळ-मंगळ करून आपली फसवणूक करीत आहे. म्हणून कांहीं क्रांतिकारक प्रत्यक्ष कृतीचा अवलंब केल्याशिवाय सरकार आपलें असलें तरी वळणार नाहीं, असें त्यांना वाटलें. सुप्रसिद्ध आंध्र काँग्रेस पुढारी, गांधींचे परम अनुयायी स्वामी सीताराम यांनीं एतत्-प्रीत्यर्थ उपवास










करून सत्याग्रहास आरंभ केला. हजारों लोक त्यांच्या हांकेला ' ओ ' देऊन तुरुंगांत जायला, कोणतीही हालअपेष्टा भोगायला तयार झाले. त्यांच्या नेतृत्वाखालीं चाललेल्या आंदोलनाचा उपहास करण्याचा प्रयत्न कांहीं जबाबदार काँग्रेस पुढाऱ्यांकडूनहि झाला. पण गेल्या वर्षाच्या शेवटीं अचानकपणें भारतीय राजकीय रंगभूमीवर असा एक पुरुष अवतीर्ण झाला कीं त्याच्यामुळें सर्व जग चकित झालें ! सत्याग्रह-तंत्रामध्यें निष्णात म्हणवणाऱ्यांनीं देखील त्याच्यापुढें हात टेकले. हा प्रायोपवेशनाचा सत्याग्रह करणारे पुरुष म्हणजे कै. श्री. पोट्टी श्रीरामुलू हे होत. त्यांनीं सुमारें दोन महिने अन्नत्याग करून शेवटीं आंध्र राज्याप्रीत्यर्थ आपल्या देहाचें विसर्जन केलें. या त्यांच्या आत्महोमाबद्दल आंध्र लोक त्यांचे कायमचे ऋणी रहातील. " मद्रास राजधानी करून आंध्र राज्य ताबडतोब स्थापा किंवा मद्रास स्वतंत्र राज्य करून त्यापासून आंध्र स्वतंत्र वेगळा काढा " अशी श्रीरामुलूंची मागणी होती. त्यांचे प्राण जाईपर्यंत राजकारणी लोक त्यांच्याकडे उपहासगर्भ उपेक्षेनें पहात होते. शेवटीं जेव्हां उपवास सोडण्याबद्दलच्या सगळयांच्या विनंत्या धुडकावून लावून त्यांनीं प्राणत्याग केला त्या वेळेला सार्वजनिक पुढारी, भारताचे मुख्य प्रधान आणि इतर सर्व यांना कळून चुकलें कीं श्रीरामुलूंचा आत्मयज्ञ ते समजत होतें त्याप्रमाणें केवळ प्रदर्शन किंवा त्रागा नव्हता ! तीन कोट आंध्र चवताळून उठले. त्यांचा क्षोभ कधीं नव्हता असा अनावर झाला. श्रीरामुलूंच्या मृत्यूनंतर जीं दृश्यें दिसलीं, ज्या घडामोडी घडून आल्या त्या पाहून गांधीजींच्या क्रूर हत्येनंतर ज्या घटना घडून आल्या त्यांची आठवण होते. कित्येक दिवसपर्यंत आंध्र प्रदेशांतील जीवनाची घडी पार विसकटून गेली. आगगाड्या, इतर दळणवळण, शाळा, कोर्टकचेऱ्या ह्या बंद पडल्या. आंध्र राज्याची स्वतंत्र निर्मिति झाल्याशिवाय दुसऱ्या कशानेंहि आंध्रांचें समाधान होणें शक्य नव्हतें. शेवटीं पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं १९ डिसेम्बर १९५२ रोजीं भारतीय सरकारनें आंध्र राज्य प्रस्थापित करावयाचें ठरविलें आहे अशी घोषणा केली. ' मद्रास राज्यांतील तेलुगू–भाषी भागांचें आंध्र राज्य बनविलें जाईल, पण त्यांत (जे. व्ही. पी. रिपोर्टमध्यें सांगितल्याप्रमाणें) मद्रास शहर येणार नाहीं' असें त्यांनीं सांगितलें.

## बेल्लारीचा वाद

नंतर निराश झालेल्या आंध्रांनीं भारतीय सरकार आतांतरी प्रामाणिकपणें पुढें काय करणार तें पहावें या आशेनें पुढील प्रतीक्षा करावयाचें ठरविलें. नियोजित आंध्र राज्याच्या आर्थिक व इतर बाजूंचा विचार करून वृत्तांत सादर करण्याकरितां भारतीय सरकारनें न्यायमूर्ति वांचूंची नेमणूक केली. न्या. मू. वांचूंनीं आपलें कार्य त्वरित बजावून आपला रिपोर्ट गेल्या जानेवारीच्या अखेरीच्या आंत सादर केला. त्यांचा रिपोर्ट एकंदरींत आंध्रांच्या आकांक्षांना अनुकूल असाच आला. आंध्र राज्याला स्वतःची अशी कायमची राजधानी मिळेपर्यंत त्याची राजधानी तात्पुरती मद्रास येथें असावी अशी न्या. मू. वांचूंची शिफारस होती. आंध्रांना ज्यांचा शब्द प्रमाण आहे असे आंध्रकेसरी श्री टी. प्रकाशम् यांनीं या शिफारशीचें मनापासून स्वागत केलें. 'आंध्रची राजधानी नाहीं तर नसेना का, पण मद्रास शहर हें स्वतंत्र नगर-राज्य (City state) होईपर्यंत तरी मद्रासवर आंध्रांचा ताबा राहील ' अशी आशा त्यांना वाटली. म्हैसुरी आणि आंध्र यांच्यामध्यें ज्याबद्दल मुख्य वाद होता तें बेल्लारी शहर व जिल्हा वांचू-रिपोर्टप्रमाणें आंध्राकडे आला. परंतु वांचू रिपोर्टची ही बेल्लारीविषयींची शिफारस भारत सरकारनें अमान्य केली आणि पुन्हां बेल्लारीच्या भवितव्याविषयीं निर्णय करण्याकरितां न्या. मू. मिश्र यांना सांगितलें. न्या. मू. मिश्र यांनीं असा निवाडा दिला कीं, बेल्लारी जिल्ह्यांतील अलुर, अडोनी आणि रायदुर्ग हे तीन तालुके वगळून बाकी राहिलेले सात तालुके म्हैसूरला जोडण्यांत यावेत. मिश्रांच्या या शिफारशीमुळें आंध्रामध्यें पुन्हां असंतोषाची लाट पसरली. तथापि भारताच्या मुख्य प्रधानांनीं मिश्रांच्या या शिफारशीप्रमाणें, बेल्लारी जिल्ह्याच्या १० तालुक्यांतील तीन तालुकेच फक्त आंध्र राज्यांत समाविष्ट होतील असें २० मे १९५३ ला जाहीर केलें. आपली राजधानी निवडण्यास आंध्रांना सांगण्यांत आलें. विधिमंडळांतील आंध्र सदस्यांनींच हा निर्णय घ्यावयाचा होता. त्याप्रमाणें त्यांनीं श्री. टी. प्रकाशम् यांच्या मार्गदर्शनाखाली कुर्नुल ही राजधानी निवडली. रायलसीमा विभाग जो नेहमींच दुष्काळग्रस्त असतो, त्याला बळविण्याकरितांच हा निर्णय घेतला गेला. सर्व








आंध्र विभाग ऐक्यरज्जूनें बद्ध व्हावेत हा या निर्णया-मागें हेतु होता. कुर्नुल ही राजधानी निवडल्यामुळें इतर आंध्र विभागांची, विशेषतः कम्युनिस्टांची निराशा झाली. कम्युनिस्टांना रेल्वे व पाटबंधारे यांच्या केंद्रस्थानीं असलेलें विजयवाडा हें शहर राजधानी म्हणून पाहिजे होतें. जेथून कम्युनिस्ट लोक नेहमीं वादळ उठवतात तो आंध्र विभागांतील वादळी टापू जें तेलंगण त्याला लागूनच विजयवाडा आहे.

शेवटीं मुख्य प्रधानांच्या निवदेनाप्रमाणें आंध्र-राज्य-निर्मितीचें बिल भारतीय लोकसभेपुढें ऑगस्टमध्यें मांडलें जाऊन दीर्घ चर्चेनंतर तें ' आंध्र राज्य कायदा १९५३ ' म्हणून मंजूर झालें. आंध्र राज्याची स्थापना व उद्‌घाटन १ आक्टोबर १९५३ रोजीं मुख्य प्रधान पं. जवाहरलाल नेहरु यांच्या हस्तें होणार आहे.

### विधिमंडळ, न्यायालय

आंध्र राज्याला एकच विधिमंडळ रहाणार आहे. अलूर आणि अडोनी हे तालुके कुर्नुल जिल्ह्यांत समा-विष्ट होतील आणि रायदुर्ग हा तालुका आंध्रांतील अनंतपूर जिल्ह्याचा भाग राहील. घटनेप्रमाणें आंध्र राज्य हें "विभाग 'अ' राज्य" म्हणून गणलें जाईल. आंध्र राज्यांतील जिल्हे पुढीलप्रमाणें आहेत : श्रीककुलम्, विजग, पूर्व गोदावरी, पश्चिम गोदावरी, कृष्णा, गंटूर, नेलोर, कुरनूल, अनंतपूर, कुड्डाप्पा, चितूर आणि बेल्लारी जिल्ह्यांतील आलूर, अडोनी, व रायदुर्ग हे तालुके. बेल्लारी जिल्ह्यांतील बाकीचे राहिलेले तालुके १ ऑक्टोबर १९५३ पासून म्हैसूरकडे दिले जाणार आहेत. मध्य-वर्ती राज्यपरिषदे- ( कौन्सिल ऑफ स्टेटस् ) -मध्यें आंध्रचे बारा प्रतिनिधी रहातील व अवशिष्ट ( resi-duary ) मद्रास राज्याचे १८ प्रतिनिधी रहातील. तसेंच मध्यवर्ती लोकसभे- ( हाऊस ऑफ दि पीपल )-मध्यें आंध्रचे २८ प्रतिनिधी व अवशिष्ट मद्रासचे ४६ प्रतिनिधी राहतील.

आंध्र राज्याच्या या पहिल्या विधिमंडळांत १४० सभासद आहेत. आंध्रमध्यें जे मतदारसंघ समाविष्ट झाले आहेत त्यांच्यामधूनच निवडून आलेले हे पूर्वीचे मद्रास विधानसभेंतील सभासद होत. पूर्वी सांगितल्या-प्रमाणें आंध्रला लेजिस्लेटिव् कौन्सिल असणार नाहीं. मद्रासच्या लेजिस्लेटिव् कौन्सिलमध्यें जे २१ आंध्र सभासद होते त्यांचें सभासदत्व यापुढें रद्द होईल. जाने-वारी १९५६ पासून किंवा राष्ट्रपति जी तारीख ठरवितील त्या तारखेपासून, आंध्र राज्याचें उच्च न्यायालय (हायकोर्ट) अस्तित्वांत येईल. तोंपर्यंत मात्र मद्रास हायकोर्टाचाच अंमल आंध्र राज्यांत चालेल. मद्रास, आंध्र व म्हैसूर या राज्यांमध्यें जिंदगी, मालमत्ता, आर्थिक जबाबदाऱ्या यांची वांटणी कशी करावी याबद्दलची तरतूद आंध्र-राज्य-कायद्यानें केली असून वादाचे मुद्दे उपस्थित झाल्यास त्याबाबत राष्ट्रपतींनीं निर्णय द्यावा अशीही त्यांत तरतूद केली आहे. वांटणीमध्यें जर कांहीं अन्याय झाला तर तो दुरुस्त करण्याकरितां राष्ट्रपतींना अधिकार देण्यांत आला आहे. आंध्र-राज्य विभक्त होण्याच्या आधीं अविभक्त मद्रास राज्याच्या ज्या कांहीं आर्थिक जबाबदाऱ्या असतील त्यांपैकीं कांहीं आपल्या वांटणीच्या पार पाडण्याकरितां आंध्र, मद्रास आणि म्हैसूर यांपैकीं एकानें दुसऱ्याला किंवा मध्यवर्ती सरकार-ला द्यावयाची रक्कम राज्यघटनेनें तरतूद केलेल्या संयुक्त निधी-( कन्सॉलिडेटेड फंड )वर आकारली जावी अशीहि तरतूद कायद्यानें केली आहे. ह्या सर्व तरतुदी न्यायमूर्ति वांचू यांच्या रिपोर्टावर आधारलेल्या आहेत. देण्याघेण्याचें प्रमाण लोकसंख्येच्या प्रमाणावर ठरवलेलें आहे. उदा०, आंध्र राज्याचा वांटा शेंकडा ३६ इतका राहील. कारण आंध्र राज्याची लोकसंख्या २०५०७८०१ म्हणजे शेंकडा ३६ आहे. अवशिष्ट मद्रासराज्याची लोकसंख्या ३५७३४४८९ असून त्याचा वांटा शेंकडा ६२$\frac{1}{3}$ आहे. बेल्लारी जिल्ह्यांतील अलूर, अडोनी, रायदुर्ग हे तालुके वगळून इतर राहिलेल्या तालुक्यांची लोकसंख्या ७७३७१२ इतकी आहे. म्हणून त्यांचा वांटा शेंकडा १$\frac{1}{3}$ आहे.

आंध्र-राज्य विभक्त होण्यापूर्वी मद्रास राज्यानें तुंग-भद्रा योजनेस आरंभ केलेला होता. आतां असें ठरलें आहे कीं आंध्र-राज्याच्या स्थापनेनंतर अवशिष्ट मद्रास राज्याचा या तुंगभद्रा योजनेशीं कांहींहि संबंध असूं नये. आंध्र राज्यांत पुढील कांहीं काळपर्यंत अनेक गोष्टींची उणीव राहणार आहे : उदाहरणार्थ, स्त्री-कैद्यांकरतां तुरुंग, बोर्स्टल संस्था, पोलीस शिक्षण-संस्था, सरकारी छापखाना, विणकामाचें शिक्षण देणाऱ्या संस्था, आयुर्वेदीय औषधांच्या संस्था, फिंगर-प्रिंट ब्यूरो, व्हेटर्नरी कॉलेज, सेंट्रल सर्व्हे, महारोग्यांकरतां आरोग्यकेंद्र इत्यादि. कायद्यानें अशी तरतूद केली







आहे कीं या वरील सोयी होईपर्यंत आंध्र राज्यानें अवशिष्ट मद्रास राज्याशीं करार करून तेथील सोयींचा उपयोग करावा. जर जानेवारी १९५४ पर्यंत या बाबतींत कांहीं करार होऊं शकला नाहीं तर राष्ट्रपति या बाबतींत जी तरतूद करतील ती अंमलांत यावी.

## विशाल आंध्राचें ध्येय

आज जें आंध्र-राज्य प्रस्थापित होत आहे, त्या योगानें आंध्रांचे सर्व मनोरथ पूर्ण झाले असें मात्र नव्हे. त्यांचें विशाल आंध्राचें चिरवांछित स्वप्न फलद्रूप झालें नाहीं याबद्दल त्यांना तीव्र असमाधान आहे. परंतु कुर्नूल ही राजधानी निवडल्यानें हें त्यांचें स्वप्न पुढेंमागें पूर्ण होईल अशी त्यांना आशा वाटते. कुर्नूल-पासून हैद्राबाद हें सुमारें १५० मैलांवर असून हैद्राबादच आपल्या भावी विशाल आंध्राची राजधानी व्हावी असें आंध्रांच्या मनांत आहे. याशिवाय बेल्लारी जिल्ह्यांतील जे सहा तालुके व खुद्द बेल्लारी शहर हीं आज म्हैसूर राज्यांत समाविष्ट झालीं आहेत तीं सर्व आंध्र राज्याला मिळावींत, कारण तो भाग प्रामुख्यानें आंध्रच आहे असेंहि त्यांना वाटतें. मद्रास शहर आंध्रचा एक भाग तरी असावा किंवा तें जेथें त्यांना प्रवेश मिळूं शकेल असें एक स्वतंत्र शहराचें राज्य ( City State ) व्हावें अशी त्यांची अजून मागणी आहे. गंजम् आणि विजगापट्टम् या जिल्ह्यांतील जयपूर इस्टेट, पुट्टंगी तालुका, छत्रपूर, बऱ्हाणपर हे तालुके आणि पार्लाकिमेडी एजन्सी– हा सर्व भाग जो ओरिसा राज्यांत सामील झाला आहे– तो परत आंध्र देशांत सामील व्हावा अशी आंध्रांची मागणी आहे. मध्यभारतांतील चांदा जिल्हा व बस्तर संस्थान हीं प्रामुख्यानें तेलुगुभाषी असल्यामुळें आंध्रांना तींहि पाहिजे आहेत. याशिवाय हैद्राबाद राज्यांतील ८० लाखांवर लोकसंख्या असलेले जे तेलंगणांतील आंध्र जिल्हे म्हणजेच हैद्राबाद राज्याची सुमारें अर्धी लोक-संख्या त्यांना आंध्र राज्यांत समाविष्ट व्हावयास पाहिजे आहे. हैद्राबाद राज्याचा बाकीचा अर्धा भाग म्हणजे राहिलेले ८ जिल्हे त्यांपैकीं ५ महाराष्ट्राकडे जातील व ३ कन्नडकडे जातील. शिवाय म्हैसूर राज्यांतील कोलार हा विभाग आंध्र असून तोहि त्यांना पाहिजे आहे. विशाल आंध्राचें ध्येय त्याचप्रमाणें महाराष्ट्रीयांचें आणि कन्नडिगांचें आपआपल्या भाषिक राज्यांचें ध्येय सत्यसृष्टींत उतरण्याची आशा दोन गोष्टींवर अवलंबून आहे : भारत सरकार जें कमिशन नेमणार आहे त्या कमिशनवर आणि हैद्राबाद राज्याचीं शकलें करून त्यांची वाटणी करण्यावर.

आंध्र लोक फार भावनाशील लोक आहेत. त्यांना आपल्या प्राचीन संस्कृतीबद्दल अत्यंत उत्कट अभिमान वाटतो. शालिवाहन किंवा शातवाहन घराण्यानें अमरा-वतीहून चालविलेलें साम्राज्य, बेझवाडा आणि वारण-गळ येथून राज्य करणारीं अनुक्रमें चालुक्य आणि काकथीय साम्राज्यें, चौदाव्या शतकांत होऊन गेलेले विजयानगरचें साम्राज्य आणि शेवटीं सतराव्या शतकांत, मुसलमानांच्या छत्राखालीं का होईना, भरभराटी-ला आलेलें गोवळकोंड्याचें राज्य– ह्या सर्व साम्रा-ज्यांच्या स्मृती त्यांच्या अद्यापि ताज्या आहेत. आपल्या आंध्र राज्याचा विकास करणें, आपल्या या प्राचीन स्मृती जागृत ठेवून आपली विशिष्ट संस्कृति विकसित करणें, आणि अशा रीतीनें भारतवर्षाच्या वैभवांत भर घालणें, असा संकल्प आंध्र देशीयांनीं केला आहे. हल्लीं आंध्रप्रदेशांतील राज्यापैकीं १ कोट ६८ लक्ष एकर जमीन लागवडीखालीं आहे. परंतु नद्या आणि तलाव यांतील जलसंपत्तीचा भर-पूर उपयोग करून घेऊन, लागवडीला योग्य अशी सर्वच्या सर्व ३ कोट २० लक्ष एकर जमीन लागवडी-खालीं आणण्याची आंध्र राज्याची मनीषा आहे.

आजचें आंध्र राज्य अर्धवट व विकलांग असें आहे. फाळणीनंतर किंवा बिहारचा बंगाली भाग न मिळाल्याळें जशीं बंगालची विकलांग स्थिति झाली आहे तशीच आंध्र राज्याची आहे. परंतु १९५३ च्या आंध्र कायद्यामध्यें पुढील विस्ताराची व विकासाचीं बीजें दिसत आहेत. आंध्राला सुरवात झालीच आहे. आतां लवकरच महाराष्ट्र, कन्नड आणि केरळ हीं राज्यें अस्तित्वांत येऊन हीं सर्व भारतवर्षाच्या उन्नती-करतां कारणीभूत होतील अशी मला दृढ आशा आहे.



अनुक्रमणिका








प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर

# संमेलनाध्यक्ष श्री. विठ्ठलराव घाटे

अनेक प्रसिद्ध व्यक्तींना खऱ्या अर्थानें फारसें वर्णनीय व्यक्तिमत्त्व नसतें. व ज्यांना वर्णनीय असें व्यक्तिमत्त्व असतें, अशा प्रसिद्ध व्यक्तींच्या संबंधीं सर्वसाधारण समाजांत बरेच चुकीचे ग्रह असतात. त्यामुळें प्रसिद्ध व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं लिहिणें म्हणजे त्यांच्या संबंधींचे सामान्य ग्रह दुरुस्त करण्यापासूनच सुरवात करावी लागते. त्यांतून, आज मी हें व्यक्तिवर्णन दूरच्या गांवीं प्रतिकूल मनःस्थितींत लिहीत आहे. त्यामुळें वाङ्मयीन अगर चरित्रात्मक तपशीलांत शिरणेंहि मला शक्य नाहीं. व म्हणूनच सामान्यतः वृत्तपत्रांतून माहित झालेले विठ्ठलराव व मला माहित असलेले विठ्ठलराव यांची सांगड घालण्याचेंच काम मी येथें करूं शकेन. एका कारणामुळें मात्र त्यांच्या या अभिनंदनीय निवडीच्या प्रसंगीं मीच लिहिणें उचितहि होतें आणि अपरिहार्यहि होतें. तें कारण म्हणजे, अध्यक्षपदाकरितां सुचविलेल्या सहा नांवांपैकीं त्यांचेंच नांव यंदा निवडणें उचित होईल, असें नांवें जाहीर होतांच मी जाहीरपणें मुंबईच्या '**लोकसत्ता**' पत्रांत प्रतिपादिलें होतें.

पण '**लोकसत्तें**'तील माझ्या या पहिल्या पाठिंब्यापासून विठ्ठलरावांसंबंधीं पुनः लिहिण्याची आवश्यकता उत्पन्न झाली होती. कारण मी 'लोकसत्तें'तील माझ्या पाक्षिक स्तंभांत, अहमदाबादच्या अध्यक्षीय निवडणुकीसंबंधीं माझें मत लिहिल्याबरोबर त्या लेखाशेजारींच 'लोकसत्ते'च्या संपादकांना "**भलतेंच कांहीं तरी**" या मथळ्याखालीं विरोधी अग्रलेख लिहिण्याची आवश्यकता वाटली ! '**नवभारत**' मासिकाच्या संपादकांनीं मला लिहिण्याचा आग्रह केल्याबद्दल त्यांचे आभार मानणें जितकें जरूर, तितकेंच 'लोकसत्ते'च्या संपादकांचेहि आभार मानणें जरूर आहे. कारण त्यांच्या लेखामुळेंच विठ्ठलरावांसंबंधीं कित्येकांना अद्याप काय सांगणें जरूर आहे, हें स्पष्ट झालें व माझें काम मर्यादित व सोपें झालें.

### कांहीं सुशिक्षितांची बौद्धिक गफलत

विठ्ठलराव घाटे हे आज सेवानिवृत्त डेप्युटि डायरेक्टर ऑफ् पब्लिक् इन्स्ट्रक्शन्, मुंबई कायदेमंडळाचे सभासद व पुणें विद्यापाठाच्या कार्यकारी मंडळाचे सभासद म्हणून वृत्तपत्रवाचकांना व सार्वजनिक कार्यकर्त्यांना ठाऊक आहेत. त्यांतल्या त्यांत शिक्षणखात्यांत 'अधिकारी' म्हणूनच ते सुशिक्षितांना अधिक माहित आहेत. पण या माहितीमुळेंच त्यांच्या संबंधींच्या ज्ञानांत अप्रमाणता ( lack of perspective ) उत्पन्न झाली आहे. सामान्यतः बडा सरकारी नोकर म्हणतांच महाराष्ट्रीय सुशिक्षितांच्या त्याच्या संबंधींच्या समजुती इतक्या ठरून गेलेल्या असतात कीं, त्या खुर्चीवर एखादा वेगळया जातीचा मनुष्य बसूं शकेल व उभा जन्म तेथें काढूनहि आपलें भिन्नत्व टिकवूं शकेल, याची त्यांस कल्पनाच नसते. शिवाय घाटे यांच्या बुद्धिमत्तेची व तडफेची ज्यांस माहिती आहे, त्यांस डेप्युटि डायरेक्टरची जागा ही त्यांच्या इतर सर्व गुणांहून उंच ठरण्याइतकी मोठी खासच वाटणार नाहीं. बाणेदार माणसें साधारणपणें व्यवहाराच्या क्षेत्रांत त्यांच्या लायकीच्या मानानें मागेंच दडपलीं जातात. विठ्ठलरावहि या नियमाला अपवाद नाहींत. निदान त्यांच्या वाङ्मयीन व वैयक्तिक गुणांकडे दुर्लक्ष होण्याइतकें आपण त्यांच्या 'अधिकारीपणा'स महत्त्व देऊं लागलों, तर त्यांच्या सरकारी नोकरीचा परिणाम आपणांवरच अधिक झाला असा अर्थ होईल !

---

येत्या ऑक्टोबर १९५३ मध्यें अहमदाबाद येथे भरणाऱ्या मराठी साहित्यसंमेलनाचे नियोजित अध्यक्ष **श्री. विठ्ठलराव घाटे** यांच्यावरील प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचा प्रस्तुत लेख वाचकांस समयोचित आणि उद्बोधक वाटेल. स्वतावर एक अत्यंत दुःखदायक कौटुंबिक आपत्ति कोसळल्यामुळें, मनःस्वास्थ्य नसतांनाहि प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनीं विषयाचें महत्त्व व औचित्य जाणून, प्रस्तुत लेख लिहून पाठविला याबद्दल 'नवभारता'तर्फे आम्ही त्यांचे विशेष कृतज्ञ आहोंत. —का. सं.

आणि सामान्य माणूस आज विठ्ठलरावांच्या बाबतींत हीच चूक करतो. तो त्यास 'माजी शिक्षणाधिकारी' समजण्याऐवजीं, 'माजी साहित्यिक' समजतो! विठ्ठलराव शिक्षणखात्यांतून मुक्त झाले, असें समजण्याऐवजीं ते 'साहित्यखात्यां' तून पेन्शनींत निघाले असें तो मानतो! या बौद्धिक गफलतीचें अगदीं ढोबळ उदाहरण म्हणजे वर निर्देशिलेला 'लोकसत्ते' तील अग्रलेख व त्यानंतर क्वचित् एखाद्या वृत्तपत्रांत त्याला दिलेला पाठिंबा हें होय.

श्री. विठ्ठलराव घाटे यांचा पिंड अस्सल साहित्यिकाचा आहे व त्यांनीं जें साहित्य लिहिलें आहे, तेंहि अस्सल आहे, इतकेंच नव्हें तर तें आपल्या विशिष्ट दालनांत अद्वितीय आहे, असें माझें तर निश्चित मत आहेच. पण तसें मत असणारे शेंकडों सुबुद्ध लोक आहेत. पण असें मत नसणारेहि कांहीं लोक आहेत, हें या निवडणुकीच्या निमित्तानें जे क्वचित् भिन्न सूर निघाले त्यांवरून दिसून येतें. ते सूर उपेक्षणीय मानण्याइतके थोडे असले, तरी ते एका विशिष्ट प्रवृत्तीचे द्योतक असल्यानें विठ्ठलरावांना निवडणाऱ्या बहुसंख्य साहित्यप्रेमी मतदारांबरोबरच या 'अल्पमत'दारांचाहि विचार करणें जरूर आहे.

विठ्ठलराव व माधवराव या दोघांनीं मिळून '**मधुमाधव**' नांवाचा एक लहानसा काव्यसंग्रह सुमारें तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला आहे. त्या संग्रहांतील सर्वच कविता उच्च दर्जाच्या आहेत; पण "**नवलाख दिवे हे तुझ्या घरीं**" या विठ्ठलराव यांच्या कवितेंतील उदात्त भाव व संगीत केवळ असाधारण आहे. तुलनेनेंच सांगावयाचें झालें तर केशवसुतापासून तों आजमितीपर्यंतच्या आधुनिक कवींत तांबे सोडल्यास दुसरा कोणीहि ही कविता लिहूं शकला नसता.

पण विठ्ठलरावांचें खास क्षेत्र म्हणजे अत्यंत सूचक, संयत व काव्यमय गद्यांत त्यांनीं रेखाटलेलीं शब्दचित्रें होत. याच क्षेत्रांत मी त्यांचें साम्य आचार्य काकासाहेब कालेलकर यांच्याशीं आहे असें म्हटलें होतें. घाटे यांना पाठिंबा देतांना, मी आणखी असेंहि म्हटलें होतें कीं कित्येक कारणांनीं काकासाहेबांच्या नांवास विरोध होणें साहजिक असलें, तरी सुचविलेल्या साही नांवांत बावनकशी साहित्यिकाचा पिंड असलेले दोघेच: — एक कालेलकर व दुसरे घाटे. आणि येथेंहि फिरून हें उच्चारण्यास मला दिक्कत वाटत नाहीं कीं, काणेकर, चिं. वि. जोशी, तर्कतीर्थ जोशी व दि. ब. बा. वि. जोशी या सर्वांहून कालेलकर व घाटे यांचा वाङ्मयाशीं अधिक निकट व अधिक मानार्ह संबंध आहे.

आणखी अनेकांचें हें मत असेलहि; पण ज्यांचें तसें मत नसेल, त्यांना जर आमचें मत समजाऊन घ्यावयाचें असेल, तर त्यांनीं आपले वाङ्मयविषयक निकष घासूनपुसून घेतले पाहिजेत. तसें करण्याऐवजीं घाटे बड्या अधिकारावर होते व क्षीरसागर मित्रकार्य करण्यास प्रवृत्त झाले आहेत, असें 'लोकसत्ते' प्रमाणें म्हणणें म्हणजे वाङ्मयीन निकषाऐवजीं पूर्वग्रहावरच भिस्त ठेवण्यासारखें आहे!

वस्तुतः मी व घाटे मित्र आहोंत असें म्हणणें हेंहि तितकें बरोबर नाहीं. आमचे दोघांचेंहि कै. माधवराव यांच्यावर आदरयुक्त प्रेम होतें व त्यामुळें आम्हांला एकमेकांविषयीं जिव्हाळा आहे हें खरें. पण व्यवहाराच्या क्षेत्रांत एकमेकांचीं कामें करून परतफेड करण्यासारखे ज्यांचे संबंध असतात, त्यांतले आम्ही खासच नाहीं. शिवाय माधवरावांवर विठ्ठलरावांचें प्रेम होतें व माझेंहि होतें हें खरें असलें, तरी माधवरावांशीं आमचीं नातीं भिन्न होतीं. विठ्ठलराव हे माधवरावांचे वडील बंधू म्हणतां येतील, तर माधवराव हे माझे वडील बंधू मानावे लागतील. अर्थात् माझा विठ्ठलरावांशीं संबंध अप्रत्यक्ष होय; व जो कोणता असेल, तो व्यावहारिक नसून गुणांसंबंधींच्या आदरांतून निर्माण झालेला आहे. सारांश, विठ्ठलरावांत ते गुणच नसतलि, तर आमच्या जिव्हाळ्याला आधारहि उरणार नाहीं. पण "जगांत फक्त व्यावहारिक संबंधच असतात", "गुण नसतांहि एकमेकाला हात देऊन पुढें रेटणें म्हणजेच मैत्री" वगैरे सूत्रेंच घट्ट पकडायचीं म्हटल्यास मात्र, माझे व विठ्ठलरावांचे संबंध समजणार नाहींत!

### उत्कट, सूचक, संयत शब्दचित्रण

ज्यांचे वाङ्मय-निकष निश्चित असतील, ते पुस्तकांच्या संख्येवरून साहित्याचा दर्जा ठरविणार नाहींत असें मला वाटतें. व म्हणून ज्यास मी वर विठ्ठलरावांचें खास क्षेत्र म्हणून म्हटलें, त्या सूचक, संयत शब्दचित्रांच्या क्षेत्रामुळें विठ्ठलरावांचें मराठी वाङ्मयांतील स्थान अढळ व असाधारण आहे ही गोष्ट निर्विकार मनास पटण्यास हरकत नाहीं असें वाटतें. विठ्ठल-



अनुक्रमणिका








राव यांचीं शब्दचित्रें 'कांहीं म्हातारे' या त्यांच्या सुप्रसिद्ध पुस्तकांत ग्रथित झालीं आहेत. पण या पुस्तकांत आलीं तेवढींच काय तीं त्यांचीं शब्दचित्रें व हेंच त्यांचें प्रमुख वाङ्मय असेंहि नाहीं. वाकबगार हातानें व अलिप्त वृत्तीनें काढलेलें 'शब्दचित्र' हें जणू विठ्ठलरावांनीं खास बनविलेलें वाङ्मयीन माध्यमच होय. या त्यांच्या असाधारण सामर्थ्याचा आणि खास माध्यमाचा मला अगदीं अलीकडे एकदोन प्रसंगीं गमतीदार अनुभव आला. विठ्ठलराव कारवार साहित्यसंमेलनाहून नुकतेच परत आले होते. माझी त्यांची त्याच दिवशीं सहज भेट झाली. मी सम्मेलनाला आलों नाहीं याबद्दल माझी कींव करून ते कारवारच्या सौंदर्याविषयीं बोलूं लागले. त्यांनीं हेच आपले मनःसंस्कार कुठें तरी चित्रित करावे, असें मी सुचविलें व 'रविवारच्या केसरींत लिहा' असेंहि सुचविलें. त्यावेळीं त्यांनीं लिहिलेला लेख त्यांचें हें चित्रणसामर्थ्य उत्तम प्रकारें निदर्शनास आणील. सुस्पष्टता, सूचकता, रेखीवपणा, निसर्गचित्रण, प्रासंगिक भाष्य, निर्भय उपहास सर्व कांहीं त्यांत आढळेल. आणि सर्वांत आश्चर्य म्हणजे नुकत्याच पाहिलेल्या सोहाळ्याची व सार्वजनिक कार्याची डोक्यांत नुसती गर्दी उसळून गेली असतांहि, त्यांच्या वर्णनांत पाल्हाळ यत्किंचित् आढळणार नाहीं. लेखक जणूं शंभर वर्षांनीं समालोचन करीत आहे किंवा पांच हजार मैल दूरच्या देशांतील एखाद्या लंडन टाइम्स करतां 'इम्प्रेशन्स' धाडीत आहे!

तोच अनुभव गेल्या वर्षींचें त्यांचें मुंबई ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिक सम्मेलनाचें भाषण वाचतांना आला. त्या भाषणांत त्यांनीं प्रान्तिक भाषांच्या भवितव्याचा प्रश्न सोडविला होता. भरपूर राजकीय व ऐतिहासिक माहिती असूनहि तें भाषण केवळ रूक्ष राजकीय भाषण वाटणार नाहीं, तर वैयक्तिक श्रद्धेचा प्रतिज्ञापूर्वक उच्चार वाटेल. विचारांच्या दृष्टीनें तें अत्यंत खोल व सूक्ष्म वाटेल; पण भाषेच्या दृष्टीनें अत्यंत सुगम व कलात्मक वाटेल.

सारांश, एकदा लिहायला बसल्यावर ज्यांच्या लेखणींतून दुर्मिळ बावनकशी सोनेंच बाहेर पडणार अशा अगदीं थोड्या लेखकांत मी विठ्ठलरावांची गणना करतों. त्यांची शारीरिक हयात शिक्षणाच्या क्षेत्रांत गेली असली तरी मानसिक हयात वाङ्मयीन चिन्तनांतच गेली आहे याचा प्रत्यय मला आणखी एकदां आला. १९४९ सालीं पुण्यास भरलेल्या साहित्यसम्मेलनाच्या कविसम्मेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. नवकाव्यासंबंधीं (बीभत्सतावादी काव्यासंबंधीं) कोणतें मत व्यक्त करावें, हा आज काव्याच्या क्षेत्रांतील फारच अवघड प्रश्न होऊन बसतो. मजसारखे अनेक लोक लेखांतून व व्यासपीठावरून त्या काव्यासंबंधीं उघड तिटकारा व्यक्त करीतच आहेत. पण त्या काव्याचे विकृत व हेकट जनक आणि दुर्बळपणामुळें त्याचा धिक्कार करण्याला घाबरणारे सर्वसामान्य टीकाकार यांच्या वृत्तीकडे पाहून आमच्यासारख्यांना इतका उद्वेग येतो कीं, आमच्या नवकाव्यविषयक टीकेंत प्रसन्नता व निर्विकारता टिकविणें मुष्किल होतें. वस्तुतः तें भाषण लिहिण्यापूर्वीं विठ्ठलरावांनीं मुद्दाम माझ्याशीं चर्चा करून आपले निर्णय पडताळून पाहिले होते. (या पडताळून पाहण्याच्या कार्यक्रमांतच आम्हां दोघांना साताऱ्याच्या वाटेवरील भीषण मोटर अपघातांत सांपडावें लागलें! व चर्चा मध्येंच तुटली!!) त्यानंतर तें भाषण मला एकदम सम्मेलनांतच ऐकतां आलें. ज्या विचारांत आमचें दोघांचेंहि मतैक्य, जे विचार लेखांतून, व्यासपीठावरून, रेडिओंतून मांडून मी कित्येकदां खऱ्या काव्यभक्तांचे धन्यवादहि मिळविले होते, तेच विठ्ठलरावांच्या भाषेंत ऐकतांना मला अपूर्व व साश्चर्य आनंद वाटत होता. कारण जें मांडतांना आम्ही नवकाव्यविरोधक टीकाकार त्रस्त, संतप्त आणि घामाघूम होत होतों, तेंच विठ्ठलरावांनीं इतक्या प्रसन्न, निश्चित व किमान शब्दांत मांडलें होतें, कीं वाङ्मयांतील कांहीं करामती फक्त विठ्ठलरावच करूं शकतील, ही गोष्ट मला फिरून एकदा पटली!

## अमर शोकोद्‌गार

उत्कट, संयत व सुस्पष्ट शब्दचित्रणांत विठ्ठलरावांचा हात धरणारा दुसरा लेखक नाहीं, हें आजच्या वाङ्मयीन निकषांच्या बेबंदशाहींतहि समजाऊन घ्यायचें असेल, तर, मी विठ्ठलरावांच्या आणखी एकाच भाषणाचा पुरावा देईन. व त्यावरूनहि ज्यांच्या डोक्यांत प्रकाश पडणार नाहीं, त्यांना त्यांच्या अज्ञान-क्षालनार्थ परमेश्वर व पुनर्जन्म यांच्या हवालीं करीन!

तें भाषण म्हणजे विठ्ठलराव यांनीं माधवराव यांच्या निधनप्रसंगीं मुंबई रेडिओवरून केलेलें भाषण होय! शब्दाच्या कुंचलीनें आत्माविष्कार करणाऱ्या वर्गाची खरी












परीक्षा भावनांच्या अनिवार क्षोभाच्या वेळींच होत असते. प्रिय व्यक्तीचें निधन ही अशा कठिण परीक्षेची वेळ असते. ज्यांना एकटें बसून अश्रू ढाळायचे असतील, त्यांचा वांटा क्लेशदायक असला तरी सोपा असतो. पण ज्यांना आपल्या प्रिय व्यक्तीचें अपूर्वत्व आणि कमनीयत्व साऱ्या जगताला जाहीर करणें प्राप्त असतें, त्याचें काम फार दुष्कर असतें. प्रेमळांप्रमाणेंच आपले उद्गार मत्सरी लोकहि ऐकणार, सश्रद्धांबरोबरच अश्रद्धहि ऐकणार, मित्रांप्रमाणेंच शत्रूंनाहि ते ऐकूं जाणार या जाणीवेनें शोक करणाऱ्या व्यक्तीचा जीव गडबडून जातो. व आपलें दुःख आपल्या जवळच ठेवावें असें वाटतें! पण आपल्या प्रिय व्यक्तीला सार्वजनिक जीवन असल्यास तेंहि करून चालत नाहीं. कलात्मक अलिप्ततेला (objectivity ला) 'भ्रतारेंवीण' 'नित्य नवा अग्निप्रवेश' करावा लागतो तो अशाच प्रसंगीं!

हा अग्निप्रवेश विठ्ठलरावांनीं कोणत्या तपःसदृश कलात्मक संयमानें केला आहे, हें कळण्याची ज्याची पात्रता असेल, तो विठ्ठलराव साहित्यिक आहेत कीं नाहींत ही शंका विचारणार नाहीं. विठ्ठलराव साहित्यिक नसतील, तर मग साहित्यिक तरी कोण? — असाच प्रश्न विचारील.

पण मराठी वाङ्मयांत खऱ्या भावनाप्रधान वाङ्मयाची किंमत होणेंच दूरापास्त झालें आहे! कारण उबवलेल्या आंब्याप्रमाणें उबवलेल्या अश्रूंच्या आढ्या घालून बसलेले धंदेवाईक 'रडवय्ये' आज हा अश्रूंचा व्यापार काबीज करून बसले आहेत. कल्चर्ड मोत्यांनीं खऱ्या मोत्यांचा व्यापार बसविला, त्याप्रमाणें कृत्रिम अश्रूंच्या वाङ्मयानें खऱ्या दुःखोद्गाराची किंमत कळूं नये असें केलें!

विठ्ठलरावांचें माधवरावांवरील हें रेडिओभाषण जगांतील अमर अशा शोकोद्गारांत (Funeral orations मध्यें) निश्चित जागा मिळवील. पं. जवाहरलालजींनीं महात्माजींच्या खुनानंतर जीं अद्वितीय भाषणें केलीं, त्यांच्याखेरीज मला घाट्यांच्या या भाषणाशीं तुलना करण्यासारखें कांहींच आढळलें नाहीं. अर्थात् शोकविषयाची श्रेष्ठता व शोकप्रसंगाची दारुणता यामुळें जवाहरलालजींची भाषणें उदात्ततेची परिसीमा गांठतात, हें मी सांगितलें पाहिजे असें नाहीं.

### उत्कट भावना व प्रखर संयम

घाट्यांच्या वाङ्मयांतील हे बहुमोल नमुने ज्याला दिसतील व पटतील त्याला सहजच, त्यांच्या बहुमोलपणाचें बीज कशांत आहे हें जाणून घेण्याची उत्कंठा लागेल. त्याचें बीज अर्थातच त्यांच्या बहुमोल व्यक्तिमत्त्वांत आहे. माझा व घाट्यांचा संबंध गेल्या पंचवीस वर्षांचा असला तरी, तो फारसा आलाच नाहीं असें मी म्हणेन. कारण एक तर आमचें नातें प्रत्यक्ष नव्हे तर माधवराबांमार्फत होतें. आणि दुसरें म्हणजे आम्ही दोघेहि भावनांचीं किंमत ओळखणारे असल्यानें, अकारण एकमेकांच्या जीवनाची चौकशी करणेंहि आम्हांला शक्य नाहीं. तथापि ज्यानें स्वतः एखाद्या घरांतील अगर कारखान्यांतील विजेच्या तारा उलगडून पाहिलेल्या नाहींत त्यालाहि त्यांचा प्रकाशहि दिसतो व धक्काहि बसू शकतो; त्याप्रमाणेंच भावनाप्रधान माणसांच्या उत्कटतेसंबंधीं असते. त्यांच्या नुसतें जवळून जाणारांनाहि त्यांची धग, त्यांचें तडपणें व त्यांची ज्वाला दिसूं शकते. मात्र पाहणाराला स्वतःला भावना हव्यात!

विठ्ठलरावांच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं मला जर पहिली गोष्ट प्रतीत झाली असेल तर ती म्हणजे अत्यंत उत्कट भावना व तितकाच प्रखर संयम! सर्वसाधारण प्रसंगीं मात्र त्यांचा एकच स्वभाव विशेष प्रत्ययाला येईल. तो म्हणजे त्यांचा थट्टेखोर स्वभाव. मी त्याला विनोदप्रियता देखील म्हणायला तयार नाहीं; कारण त्या क्षणिक खेळांत विठ्ठलराव बुद्धीनेंच काय पण मनानेंहि रमलेले नसतात. शाळेंत जाण्याच्या वयाचीं, बेफिकीर मुलें जातां जातां ज्या चित्तविहीन अवस्थेंत पायाच्या ठोकरीनें दगड उडवितात, त्याच अनवधान स्थितींत विठ्ठलराव लहानमोठयांवर आपल्या बाह्य विनोदाचा प्रयोग करतात. अनेकांना त्यांचा हा स्वभाव कळत नाहीं. अनेकांना विठ्ठलरावांचा विनोदच कळत नाहीं. अर्थात् त्या विनोदांत समजून घेण्यासारखें कांहीं विशेष नसतेंच. समजून घ्यायची असते ती विठ्ठलरावांची मनःस्थिति– mood –होय. कारण कित्येकदां तर ते जीवनाचा शीण आणि भार विसरावा म्हणूनहि थट्टा करीत असतात. आणि हा भार त्यांना कांहीं वर्षांपूर्वीच झालेल्या त्यांच्या पत्नीच्या निधनापासून तर विशेषच जाणवतो असें दिसतें!

कित्येकदां ते भोंवतालच्या माणसांच्या चेहऱ्यावरचीं किंमतींचीं विविध 'लेबलें' विसरण्याकरतां थट्टा करीत








आहेत असा भास होतो. गाडीच्या डब्यांत चहा देण्याकरतां येणारा वेटर आणि समोरच्या बाकावर बसलेला आणि नुकताच ओळखीचा झालेला एखादा प्रसिद्ध मनुष्य यांची ते एकाच पद्धतीनें थट्टा करतील ! अर्थात् त्यांच्या अशा अनवधान, अन्यमनस्क अथवा शून्यमनस्क परिहासामुळें अनेकांचे गैरसमज होतात, हें त्यांना कोणीं सांगितलें आहे कीं नाहीं मला ठाऊक नाहीं.

उत्कट भावना व त्या गिळण्याचें सामर्थ्य असा मी विठ्ठलरावांच्या जबरदस्त व्यक्तिमत्त्वाचा 'फॉर्म्युला' म्हणून सांगेन. हा फॉर्म्युला ऊर्फ सूत्र सांगणें कठीण नाहीं; पण त्याचे त्यांच्या वर्तनांत व वाङ्मयांत दिसून येणारे सर्वच परिणाम ओळखून काढणें सोपें नाहीं. उदाहरणार्थ, त्यांच्या या भावना गिळण्याच्या सामर्थ्यांत जसें त्यांच्या दिलदार वृत्तीचें इंगित आहे, तसेंच त्यांच्या मर्यादित वाङ्मय-निर्मितीचेंहि इंगित आहे, असें मी म्हटलें, तर तें किती लोकांना एकदम पत्करवेल ? विठ्ठलराव लिहितात तेव्हां अत्यंत उत्कट मनानें लिहितात; पण शब्दाविष्कार केलाच पाहिजे, असें मात्र त्यांच्या भावना त्यांना म्हणत नाहींत ! जटाजूटांत गंगेचा ओघ आणि उदरांत कालकूट विषाचा घोट पचविणाऱ्या शिवशंकराप्रमाणें बऱ्यावाईट दोन्ही भावना ते आंत ठेवूं शकतात. त्यांच्या लेखनांतील सामर्थ्याचें रहस्यहि त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील या परस्पर विरोधी गुणांतच आहे. उत्कटतेमुळें त्यांत उत्कटता उत्पन्न होते; आणि उत्कट भावनाहि गिळण्याच्या सामर्थ्यामुळें त्यांत अलिप्ततेचें सामर्थ्य उत्पन्न होतें.

## इतिहासाचें सुंदर नाट्य

याच विरोधी गुणांचा त्यांना त्यांच्या आणखी एका पुस्तकालाहि उपयोग झाला आहे. तें पुस्तक म्हणजे त्यांचें '**नाट्यरूप महाराष्ट्र**' हें पुस्तक होय. एका इतिहासप्रेमी स्त्रीजवळ मी विठ्ठलरावांच्या '**कांहीं म्हाताऱ्यां**'ची स्तुति करीत असतां ती म्हणाली, "तुम्ही साहित्यिक लोक त्यांच्या 'नाट्यरूप महाराष्ट्रा'चा उल्लेख 'कांहीं म्हाताऱ्यां'इतका कां करीत नाहीं ?" मी तिला हंसून म्हटलें "त्या पुस्तकाचें नांव शालोपयोगी पुस्तकासारखें असल्यामुळें साहित्यिकांची ही गफलत होत असावी !" स्वजनांच्या इतिहासाचें सहर्ष, प्रेमयुक्त व अभिमानयुक्त मनानें वाचन करणें व त्यानंतर त्याच इतिहासांतील प्रिय पूर्वजांकडे कठोर अलिप्ततेनें पाहणें, हें ज्यास शक्य आहे, तोच मनुष्य इतिहासाचें इतकें सुंदर 'नाट्य' करूं शकेल. मी आमच्या कित्येक दुर्विदग्ध साहित्यिक बंधूंना 'जनान्तिकां'त एवढेंच सुचवूं इच्छितों कीं, 'हें पुस्तक आपणहि वाचण्यास हरकत नाहीं ! एक अप्रतिम पुस्तक अद्याप आपल्या ध्यानींहि नव्हतें, असें तुम्हांला आढळून येण्याचा संभव आहे !'

## जीवनांत कलेंतील औदार्य

कलेंतील औदार्य जीवनांत उतरणें अर्थातच त्याहूनहि अवघड असतें. पण विठ्ठलराव 'लिहिते' पुरुष नसून 'कर्ते' पुरुष आहेत. हीच गोष्ट आपल्या परिचयाच्या पण धेडगुजरी भाषेंत सांगण्याची झाली, तर असें म्हणतां येईल कीं ते प्रथम सद्‌गृहस्थ आहेत आणि नंतर सत्साहित्यिक आहेत. औदार्याच्या कसोटीचा त्यांच्या जीवनांतील एक प्रसंग सांगावा कीं न सांगावा अशा पेचांत मी पडलों आहे. पण त्यांच्या परवानगीशिवायच इथें त्याचा पुसट निर्देश करणें भाग आहे. विठ्ठलरावांची सुविद्य कन्या उषा (सौ. अनुराधा पोतदार एम्. ए.) हिनें बी. ए. झाल्यावर श्री. पोतदार या ब्राह्मण पदवीधराशीं विवाह करण्याचें ठरविलें. विठ्ठलराव हे जातीनें मराठे आहेत, हें बहुतेक वाचकांना ठाऊक असेल. विठ्ठलरावांचे आजोबा नगर येथील वकील असून कट्टे प्रार्थनासमाजी होते. तरुणपणींच वारलेले सुप्रसिद्ध कवि 'दत्त' हे विठ्ठलरावांचे वडील. व स्वतः विठ्ठलराव रविकिरणमंडळाचे सभासद या नात्यानें सुधारणावादी आहेतच. तथापि इतकी पूर्वपीठिका असल्यावरहि, मुलामुलींच्या लग्नांत सामाजिक प्रयोगापेक्षां मुलांच्या दीर्घकालीन स्वास्थ्याला प्राधान्य देणें हा आईबापांचा धर्मच आहे. व तरुण मुलीनें केवळ भावनांना प्राधान्य देऊन ठरविलेल्या विवाहांत दीर्घकालीन सुखाची शाश्वती आहे कीं नाहीं याची शंका येऊन आईबाप अस्वस्थ होणेंहि स्वाभाविक आहे. प्रेम, कल्याणेच्छा, व्यवहारदृष्टि या सर्व भावना गिळून अल्पवयस्क मुलांच्या स्वयंवराला आशीर्वाद देणें व पुढेंहि आपले विचार दाबून त्यांच्याशीं समरस होणें, याला मनाचा केवढा मोठेपणा लागतो, हें आनुभविकांनाच कळेल. विठ्ठलरावांच्या मनाची खळबळ व तिजवर








त्यांनीं मिळविलेला विजय, हीं दोन्हीं मी अर्थात् केवळ दुरूनच पाहिलीं आहेत. तथापि इथेंहि त्यांच्या मनांतील द्वंद्वात्मक सामर्थ्याचाच त्यास उपयोग झाला आहे.

विठ्ठलरावांच्या अध्यक्षीय निवडीनें एका थोर साहित्यिकाचा योग्य सत्कार झाला आहे असेंच केवळ नव्हे, तर एका महाराष्ट्राभिमानी, कर्तबगार व भाषातज्ज्ञ गृहस्थास आपण आज या निवडीमुळें आपल्या आजच्या प्रश्नांत मार्गदर्शन करण्याला संधि देत आहों. विठ्ठलराव यांचें अहमदाबाद संमेलनांतील भाषण उत्कटता, उदारता, माहितगारपणा व मुत्सद्दीपणा यांचा प्रत्यय देणारें होईल, याबद्दल तर मला शंका नाहींच. पण वाङ्मय या दृष्टीनेंहि तें नमुनेदार होईल अशी मला खात्री आहे.

### ब्राह्मणांची विद्या व मराठ्यांचा दिलदार लढाऊ बाणा

विठ्ठलराव यांच्या निवडींत त्यांच्या मराठा जातीचा उल्लेख सकारण – अकारण झालेला आहे. मी स्वतः जातींचा उल्लेख करणें म्हणजे 'सार्वजनिक पातक' होय असें मानणाऱ्या सोवळ्या सुधारकांपैकीं नाहीं. आपण कोणत्या भावनेनें जातीचा उल्लेख करतों, याला मी महत्त्व देतों. इतका श्रेष्ठ दर्जाचा साहित्यिक ब्राह्मण अगर प्रभू समाजांत सांपडण्यापेक्षांहि, मराठ्यांत सापडण्यानें मला अधिक आनंद होतो, हें येथें नमूद करण्यांत मला मुळींच लाज वाटत नाहीं. अर्थात् यांत इतर जातींना "संधि देणें", "पुढें आणणें" वगैरे कोणताहि विचार माझ्या मनांत प्रभावी नाहीं. उलट, मराठा समाजांतील श्रेष्ठ विचारवन्त संमेलनाला मार्गदर्शक म्हणून लाभल्यास, सम्मेलनाला लागलेलें सर्वस्वी एकदेशीय (पंतोजीछाप व भटजीछाप!) वळण बदलेल, व संमेलनालाच सुसंधि दिल्यासारखें होईल, असें मला वाटतें. मुंबईच्या 'धनुर्धारी' पत्रांत एका लेखकानें माझ्या लेखाचा उल्लेख करून अध्यक्षाच्या निवडींत ब्राह्मण-प्राधान्य आहे असें सूचित केलें आहे. संमेलनाच्या अध्यक्षीय निवडींत ब्राह्मण म्हणून एखाद्याला प्राधान्य मिळत असेल असें मला वाटत नाहीं. पण आमच्या साहित्यसंस्थांची दृष्टि एकांगी, ठरीव व उथळ आहे यांत मात्र शंका नाहीं. अनेक अध्यक्ष साहित्याव्यतिरिक्त फालतुक महत्त्वामुळेंच आजवर निवडले गेले होते, हें अध्यक्षांची यादी पाहूनहि लक्षांत येईल. तसेंच अनेक लायक माणसें दुर्लक्षिलीं गेलीं होतीं, आहेत व जातील, हेंहि तितकेंच उघड आहे. 'धनुर्धारी'नें' उल्लेखिलेलें शिवचरित्रकार केळूसकरांचें उदाहरण सम्मेलनाच्या इतिहासाला लांछनच ठरेल. केळूसकरांचें 'शिवचरित्र' हें मराठी भाषेला भूषण होय. त्याचें हिंदुस्थानच्या सर्व भाषांत भाषान्तर होणें जरूर आहे. पण केळूसकरांचें नांव कांहीं वर्षांमागें सुचविलें जाऊनहि निवडलें गेलें नाहीं! याचें कारण 'पुरोगामी वाङ्मय', 'रससिद्धान्त' वगैरे ठराविक प्रश्नांच्या घाण्याभोंवतीं प्रदक्षिणा करणाऱ्या आम्हां साहित्यिकांत केळुसकरांची बैठक नव्हती एवढेंच असावें!

या ठराविकपणांतून, पुस्तकी विचारांतून, शुष्क शुकपाठांतून बाहेर पडण्याकरतांहि आपण अध्यक्षीय निवडींत थोडी स्वतंत्र बुद्धि वापरली पाहिजे. सुदैवानें घाटे यांच्याजवळ ब्राह्मणांची विद्या व मराठयांचा दिलदार लढाऊ बाणा एकत्र आहे. न कळत कां होईना साहित्यसम्मेलनानें एका वेगळ्या पार्श्वभूमीचा मार्गदर्शक निवडला, हें भावी प्रगतीचें सुचिन्हच होय.

---

## 'नवभारत' मासिकाचा बदललेला पत्ता

**येत्या ऑक्टोबर १९५३ अंकापासून 'नवभारत'** मासिक **वांई** येथील **'प्राज्ञप्रेस'** मध्यें छापलें जात आहे. व्यवस्थापकांच्या सोयीच्या दृष्टीनें 'नवभारता'च्या व्यवस्थापकांची कचेरी **वांई** येथेंच सप्टेंबर १५ पासून सुरू झाली आहे. तरी यापुढें वर्गणीदार, एजंट वगैरे यांनीं व्यवस्थापकांशीं पत्रव्यवहार करावयाचा झाल्यास तो **व्यवस्थापक : 'नवभारत' मासिक C/O प्राज्ञ प्रेस; वांई, जि. उ. सातारा.** या पत्त्यावर करावा.

'नवभारता'च्या **संपादकांची कचेरी पुणें येथेंच राहील.** संपादकांशीं पत्रव्यवहार "**वि. म. देडेकर, कार्यकारी संपादक, 'नवभारत,' ९०६ शिवाजीनगर, पुणें ४**" या पत्त्यावर करावा.

# जाहिरातींचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळां | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ” | ४० ” | २५ ” |
| बारा वेळां | ६० ” | ३५ ” | २० ” |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ” ” | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती ‘जाहिराती व जाहिरातदार’ या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात. पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक

**‘नवभारत’** C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई.

# वर्गणीदारांस सूचना

(१) ‘नवभारत’चा अंक दरमहा १ तारखेस नियमितपणें काळजी-पूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. ‘नवभारत’ कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखेपूर्वीं मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) ‘नवभारत’ च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक

**‘नवभारत’**

C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई